भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, स्वीय ग्रंथमाला क्र. ८८

# ऐतिहासिक संकीर्ण निबंध

## खंड ६ वा

---



शक १८७७ ] किंमत ५ रु. [ सन १९५५-५६

प्रकाशक : शं. ना. जोशी व ग. ह. खरे, चिटणीस,
भा. इ. सं. मंडळ, ३१३ अ सदाशिव पेठ, पुणें २.

मुद्रक : केशव गणेश शारंगपाणी, आर्यभूषण मुद्रणालय,
९१५/१ शिवाजीनगर, पुणें ४.

( त्रैमासिक वर्ष ३६ अंक १-४ )

# अनुक्रमणिका

शक १८७७ ] इ. १९५५-५६



---

* ह्या लेखाबरोबर शि.च.सा. १ लें. ६७ पुरंदरगडावरील तासाची सेवा; ऐ. पोवाडे (य. न. केळकर) प्रस्ता. पृ. ७१ रामजोशी हे तासे जोशी, हा भाग पहावा. -संपादक

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, पुणें

स्वीय ग्रंथमाला क्रमांक ८८

# ऐतिहासिक संकीर्ण निबंध

## खंड ६ वा

वर्ष ३६
शक १८७७

अंक १-२
इ. १९५५-५६

## १ निविद्-मन्त्र

( ले. पुरुषोत्तम दत्तात्रेय नवाथे एम्. ए. डे. कॉ. पुणें )

*संहितादि ग्रंथांमधून निविदांचा वारंवार उल्लेख केलेला आढळतो. यज्ञांमध्यें निविद्-मन्त्रांना सूक्तांच्या बरोबरीनें स्थान दिलेलें आहे. तथापि यज्ञकाण्डाव्यतिरिक्त त्यांचा इतरत्र संबंध येत नसल्यानें अशा महत्त्वाच्या विषयाचें स्वरूप कशा प्रकारचें आहे हें पाहणें वैदिक वाङ्मयाच्या अभ्यासाचे दृष्टीनें उपयुक्त होणारें आहे.

ऋग्वेदाच्या खिलांमध्यें पांचव्या अध्यायांत निविद्ध्याय[1] नामक प्रकरण असून त्यांत अकरा निविदांचा संग्रह आहे. ( वै. सं. मं. संपादित ऋग्वेदाची आवृत्ति, खंड ४ ). 'अग्निरेकादश लिङ्गोक्तदैवतं यजूंषि' असें म्हणून खिलानुक्रमणीनें यांचा निर्देश केला आहे. मात्र या मंत्रांचा ऋषि किंवा विनियोग यासंबंधीं उल्लेख आढळत नाहीं ही ध्यानांत घेण्याजोगी गोष्ट आहे. समग्र शाखेच्या दशग्रंथात्मक अध्ययनांत निविद्ध्यायाचा समावेश नसल्यामुळें तो म्हणण्याचा दशग्रंथी वैदिकांतहि क्वचितच प्रघात आहे.

निविद्-मंत्रांच्या देवता कांहीं एकेकस्या-अग्नि ( नि. १ ), इंद्र ( नि. ३ ), सविता ( नि. ४ ); युग्मचारी-द्यावापृथिवी ( नि. ५ ); गणचारी-ऋभु ( नि. ६ ), विश्वेदेव ( नि. ७ ), मरुत् ( नि. ९ ) अशा आहेत. बहुसंख्य निविद्, अग्नि व इंद्र या दोन देवतांसंबंधीं आहेत.

---

* संमेलन ४१ वें; श. १८७६ इ. ३१-५-५४.

१ ऐत. आ. १, ५, २ वरील सायणभाष्यांत 'इन्द्रो देवः सोमं पिबत्वित्यादिकं निवित्पदजातम् । तच्च निवित्संज्ञके ग्रन्थे ( पाठान्तर-सङ्घे ) पठितम् ।' असें म्हटलें आहे. सायणाचार्यांना नेमका कोणता 'ग्रन्थ' अभिप्रेत आहे याची कल्पना येत नाहीं,

कै. प्रि. राजवाडेकृत निरुक्ताचे मराठी भाषांतरांत ‘ कुन्तापाध्याय म्हणून ऋक्-संहितेला जोडलेलें एक प्रकरण असतें; त्यांत ह्या निविद् दिलेल्या असतात,’ (पृ. ५७३) असें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. कारण कुन्तापाध्यायांतील मंत्रांना ‘ नाराशंसी, रैभी ’ इ. नांवें असून निविद्-मंत्रांहून ते सर्वस्वीं भिन्न होत.

यज्ञामध्यें या देवतांना सोमप्राशनासाठीं आवाहन करणें हें निविदांचें मुख्य प्रयोजन होय. हें आवाहन देवतेच्या प्रशंसापर विशेषणांनीं केलेलें असतें. देवतेनें केलेले युद्धांतील पराक्रम किंवा अद्भुत कृती यांचें वर्णन निविद्-मंत्रांत अत्यंत मोजक्या परंतु वेंचक शब्दांत केलेलें आढळतें. एका दृष्टीनें शब्दचित्राचा प्राचीन नमुना म्हणून निविदांचा उल्लेख करतां येईल.

निविद् संज्ञेचें स्पष्टीकरण ऐत० ब्रा०[2] ३,९ या ठिकाणीं दिलेलें आहे. तेथें

आज अधिक माहिती या कवीसंबंधीं उपलब्ध नाहीं. या कवीचे प्रकाशदीप, स्वरूप-समाधान, अनुभवसार, गुरुलीला, अमृतसार, सीताबोध, पंचीकरण, सिद्धसंकेत इत्यादि जे पांचसहा ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांतूनहि नांवाव्यतिरिक्त इतर माहितीचा कांहीं बोध होऊं शकत नाहीं. या कवीनें आपल्या ग्रंथांत 'मुंतोजि ब्रह्मणि' किंवा कोठें कोठें 'मृत्युंजय' एवढाच आपला उल्लेख केलेला आढळतो. या कवीची रचना मराठी भाषेच्या दृष्टीनें इतकी शुद्ध व सुसंस्कृत आहे व त्याचें हिंदुधर्मग्रंथांचें व वेदांतविषयांचें ज्ञान इतकें गहन व माहितीपूर्ण आहे कीं हा कवि मूळचा मुसलमान असावा अशी चुकूनहि मनांत कल्पना येत नाहीं. उदाहरणार्थ सिद्धसंकेत या पद्मपुराणाधारें रचलेल्या ओवीबद्ध ग्रंथांची भाषा इतकी डौलदार, प्रासादिक व भरघोस आहे आणि वेदांतविवरण इतकें अधिकारपूर्ण आहे कीं त्यावरून मृत्युंजय हे मूळचे मुसलमान असावेत असें सहसा वाटत नाहीं. महिपतीच्या माहितीचा आधार सोडला तर मृत्युंजय किंवा मुंतोजी ब्रह्मणि हा यवन होता असें कोणीहि कोठें उल्लेखिलेलें आढळत नाहीं. कांहीं संतमालिकेंत तर त्यास 'मृत्युंजययोगी' किंवा स्वामी असेंहि आदरानें नमन केलेलें आढळून येतें. पण त्याच्या मूळ जातपातीची रहस्यमय घटना महिपतिव्यतिरिक्त कोणीहि नमूद केलेली आढळून येत नाहीं, तेव्हां महिपतींच्या सर्वच माहितीवर कितपत विश्वास ठेवावा याची शंका वाटते.

## मृत्युंजय स्वामी व बहमनी राजपुरुष निराळे

मृत्युंजय स्वामी व ज्या बहमनी मुसलमान राजपुरुषांसी त्यांचा संबंध आला त्या, दोन भिन्न व्यक्ति असाव्यात असें माझें साधार मत आहे. महिपति महाराजांनीं या दोन्ही नांवांची गल्लत करून मृत्युंजय व मुंतोजि ब्रह्मणि यास एकच पुरुष गणलें आहे तें बरोबर वाटत नाहीं. हा बहमनी राजपुरुष मृत्युंजय स्वामीचा शिष्य असावा व त्यास वैराग्य प्राप्त होऊन जेव्हां तो पंढरपूर क्षेत्रास गेला तेव्हां मृत्युंजयस्वामींनीं केलेल्या विवेक–सिंधूच्या निरुपणानें त्याची वृत्ति परमार्थ–प्रवण झाली असावी. मृत्युंजयस्वामी हे श्रीमुकुंदमहाराजांच्या खास परंपरेंतील एक प्रसिद्ध सत्पुरुष असून मुकुंदराजाचें एक मोठे भक्त व उपासक होते. मुकुंदराजांची परंपरा चालू ठेवण्यांत व त्यांचा विवेकसिंधु ग्रंथ महाराष्ट्रभर लोकप्रिय करण्यांत मृत्युंजय स्वामींनें विशेष कामगिरी केली असावी असें वाटतें. ज्ञानेश्वरीचा विशेष प्रसार होण्यापूर्वीं एकेकाळीं महाराष्ट्रांत किंवा पंढरपूरसारख्या वारकरीपंथाच्या क्षेत्रांत भागवतधर्मानुयायांचा एक आवडता ग्रंथ म्हणून विवेकसिंधु चांगलाच लोकप्रिय असला पाहिजे. मृत्युंजयस्वामींस मुकुंदराजानें पंढरपुरास सगुण दर्शन देऊन विवेकसिंधूची पोथी दिली व वरदहस्त ठेवला, अशी जी कथा महिपतीनें दिली आहे ती खरी असल्याबद्दल आणखीहि पुरावा उपलब्ध होत आहे. मृत्युंजय म्हणजेच मुंतोजि, ब्रह्मणि किंवा बहमुनी राजपुरुष हे महिपतीचे एकत्व मात्र बरोबर वाटत नाहीं. मुंतोजि ब्रह्मणि किंवा मृत्युंजय या नांवानें जे ग्रंथ उपलब्ध आहेत

ते बहुधा मृत्युंजय स्वामीनेंच रचले असावे; बहमनी राजपुरुषाचे नसावेत. मृत्युंजयाच्या या सर्व ग्रंथावर विवेकसिंधूच्या भाषेची व विचारांची सर्वत्र विलक्षण छाप आहे. मृत्युंजय स्वामींच्या उपदेशानें व अनुग्रहानें हा बहमनी राजपुरुष पारमार्थिक-दृष्ट्या पुढें मोठ्या योग्यतेस चढला असावा व मराठींत उत्तम ग्रंथरचना करण्याइतकें त्याचें मराठी भाषेचें ज्ञानहि वाढलें असावें. हें एकापरीनें शक्य असलें तरी मृत्युंजय किंवा मुंतोजि ब्रह्मणि या नांवानें रचलेले ग्रंथ एका बहमनी राजपुरुषाचे वाटत नाहींत. मृत्युंजयस्वामींनेंच आपल्या ग्रंथांत बहमनी राजपुरुषाचा परमार्थ अधिकार पाहून त्याचें नांव आपल्या नांवाशीं शिष्य म्हणून निगडीत केलें असावें. चांदोरकरांनींहि आपल्या संतकाविसूचींत मृत्युंजयानें बेदरचे शहास (महमद) विवेकसिंधूची पोथी दिली असें म्हटलें आहे. तेव्हां मृत्युंजय म्हणजेच बेदरचे शहा असें जें महिपतीनें म्हटलें आहे तें बरोबर दिसत नाहीं. मृत्युंजय व बहमनी शहा या दोन भिन्न व्यक्ति असाव्या व उभयतांचें गुरुशिष्य नातें असावें. मृत्युंजयाचा शिष्य असलेला हा ब्रह्मणि शहा कोण असावा याचा तपास व्हावयास पाहिजे.

## बेदरच्या शहाचा एक पुरावा

शहा मुतबजी ब्रह्मणि असा स्पष्ट उल्लेख असलेल्या एका शाहाचा पंचीकरण या नांवाचा एक ग्रंथ उपलब्ध झाला आहे. हा मुतबजी ब्रह्मणि ज्या अर्थीं आपणास शहा म्हणवितो त्याअर्थीं बेदरच्या बहमनी राजकुलांतील हा पुरुष असावा असें वाटतें. बेदरच्या बहमनी बादशहामध्यें कांहीं बादशहा हिंदुधर्मप्रेमी होऊन गेले व त्यांचा कांहीं हिंदु संतसत्पुरुषाशीं संबंध आला इत्यादि कथा गुरुचरित्रादि ग्रंथांतुन नमूद आहेत. दामाजीपंताच्या कथेंतहि बेदरच्या बादशहाचें असेंच एक नांव आढळतें. या बहमनी राजांच्या नांवाचा व माहितीचा नक्की तपास व्हावयास पाहिजे. शहा मुतबजी ब्रह्मणीचें हें पंचीकरण त्रुटित उपलब्ध झालें आहे. हिंदु व मुसलमानी धर्मग्रंथांतील तत्त्वें व विचार एकच आहेत असें या लहान ग्रंथांत प्रतिपादलें आहे व हिंदुधर्माशीं जुळतील अशीं सुफीपंथांतील तत्त्वें व साम्यस्थळें यांत विशद केलीं आहेत. आपण या पंचीकरणद्वारें हिंदु-मुसलमानांचें ऐक्य साधण्याचा प्रयत्न केला असें या बहमनी शहानें ग्रंथारंभीं म्हटलें आहे. व "शाह मुतबजी ब्रह्मणि जिनमें नहि मनामनि पंचीकरणका खोज किये हिंदु-मुसलमान येक कर दिये" असा खुलासा केला आहे. हा शहा मुतबजी ब्रह्मणि बहमनी राजवंशांतील कोणता पुरुष असावा यासंबंधींच्या संशोधनाकडे लक्ष देणें जरूर आहे. कल्याणी जवळील नारायणपुराहून दीडदोन कोसांच्या अंतरावर मुसलमान सत्पुरुषाची एक दरगाहा आहे, तेथें मोठा उरूस भरतो व हिंदु-मुसलमान या दरगाहास पूज्य मानतात असें ऐकण्यांत आलें आहे. ही दरगाहा या शहा मुतबजी ब्रह्मणीची तर नसेलना ? शहा मुतबजी ब्रह्मणीच्या या पंचीकरणानें पुढेंमागें महत्त्वाची माहिती प्रकाशांत येण्याचा संभव आहे.

ऐ. सं. सा. खं. ६–८

## मृत्युंजय स्वामींचें मूळ नांव रामस्वामी असावें काय ?

मृत्युंजय स्वामीचा काळ शक १४४० ते १४७० हा गृहित धरण्यांत आला आहे. मुकुंद राजांच्या पश्चात् दोन शतकांनीं हे पुढें होऊन गेले असले तरी मुकुंद-राजाच्या खास परंपरेंतील हे मृत्युंजय स्वामी होते असें दिसतें. मृत्युंजयाच्या कोणा अनंत नामक शिष्यानें लिहिलेली पंचीकरणाची एक पोथी उपलब्ध झाली आहे. तिच्या शेवटीं मृत्युंजयस्वामीच्या गुरुपरंपरेसंबंधीं महत्त्वाचा मजकूर दिला आहे. या पंची-करणाचा कर्ता अनंत हा मृत्युंजय स्वामीचा साक्षात् शिष्यच दिसतो. या अनंतानें मृत्युंजयस्वामींचें मूळ नांव रामस्वामी दिलें आहे हें विशेष होय. ही माहिती नवीनच प्रकाशांत येत आहे. हें पंचीकरण जुनें मराठी गद्य आहे. या अनंतकृत पंचीकरणाच्या शेवटीं मृत्यंजयस्वामीच्या गुरुपरंपरेविषयीं खालीलप्रमाणें निर्देश केला आहे. पंची-करणांतील उतारा:--

॥ श्रवण मनन निजध्यास करिता साक्ष साक्षात्कार होय ॥ प्रारब्धभोग जोवरि राहे देह दग्धपटन्याये । आपण दृष्टा अन्वय पाहता पुढे दृष्टीस आढळे तें ब्रह्मरूप ॥ सांगतल्यासारखे स्वरूप वोळखी । म्हणे **अनंत** ॥ मागे श्रीमृत्युंजया रुपा करून मुक्ति दिजें । हे बीद तुझे तुं सांभाळी ॥ "

हा अनंत श्री मृत्युंजयास मागणें मागतो कीं कृपा करून तूं मला मुक्ति दे. गुरु या नात्यानें मुक्ति देण्याचें हें तुझें ब्रीद तूं सांभाळ, अशी अनंतानें करुणा भाकली आहे.

यानंतर मृत्युंजयस्वामींची परंपरा पुढीलप्रमाणें ग्रंथाचे शेवटीं दिली आहे. पोथी अलिकडे शेंपन्नास वर्षांखालीं नकललेली आढळते. तीस जुनी म्हणतां येणार नाहीं. " आदि श्रीआदीनाथु ईश्वर श्रीहरिनाथे होम केला त्यापासाव प्रगटला ॥ त्याचा उपदेश श्रीहरिस्वामीस ॥ त्याचा उपदेश श्रीरामचंद्रस्वामीस ॥ त्याचा उपदेश श्रीमुकुंदराज-स्वामिस ॥ त्याचा उपदेश श्रीगुरुमृत्युंजयरामस्वामीस ॥ पंढरपुरी सगुण दर्शन भिमातिरी देऊन विवेकसिंधूचें पुस्तक आत्मउपासना ब्रह्मबोध ज्ञानोदय वरद प्रसन्न कर मस्तकि इति श्रीपंचकर्ण माहवाक्यः समाप्त ॥ ६ ॥ मुकुंदराजांनीं विवेकसिंधूंत जी आपली परंपरा दिली आहे तींच नांवें येथें उद्धृत आहेत. आदिनाथ परमेश्वर हा हरिनाथानें होम केला तेव्हां प्रगट झाला आणि हरिनाथ किंवा हरिस्वामीला आदिनाथानें उपदेश केला. हरिस्वामीचा उपदेश रामचंद्रस्वामींस व रामचंद्राचा मुकुंदराजस्वामींस आणि मुकुंद-राजांचा उपदेश गुरुमृत्युंजयरामस्वामींस; भीमातीरी पंढरपुरीं मुकुंदराजांनीं मृत्युंजय-स्वामींस सगुणरूप दर्शन देऊन विवेकसिंधु हा ग्रंथ दिला व आत्मउपासना व ब्रह्मबोध करून वरदहस्त ठेवला इत्यादि महत्त्वाची माहिती दिली आहे. ग्रंथाच्या शेवटचा गुरु-परंपरेचा उतारा मृत्युंजय-शिष्य अनंताच्या खास पंचीकरणांतील आहे किंवा नंतर जोडलेला आहे याचा बोध होऊं शकत नाहीं. ज्याअर्थीं " गुरुमृत्युंजयरामस्वामी " असा खास निर्देश आहे, त्याअर्थीं या पोथींतलाच तो शेवटचा उतारा असावा. यांत मृत्युंजयाचा रामस्वामी असा एक नवा नामनिर्देश केलेला आढळतो हें विशेष होय.

मृत्युंजयाच्या चरित्राचें अधिक संशोधन झालें पाहिजे असें या उपलब्ध होत असलेल्या माहितीवरून वाटतें. मृत्युंजयस्वामींच्या चरित्रासंबंधीं कांहीं सुचलेले नवीन **मुद्दे येथें** अनुमान म्हणून मांडले आहेत त्याचा सत्यशोधनाच्या दृष्टीनें उपयोग होईल अशी आशा आहे.

---

# १३ गीतेंतील एक कोडें

( कै. गो. कृ. मोडक, पुणें )

किरीटिनं गदिनं चक्रहस्त-
मिच्छामि त्वां द्रष्टुमहं **तथैव** ।
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन**
सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ११, ४६,

१ *हें पद्य गीतेमध्यें विश्वरूप-दर्शनांत आलें आहे. याचा सरळ अर्थ करूं जातां, तो पुढीलप्रमाणें होतो. **अर्थ**– हे सहस्रकरधारी विश्वरूपा ( कृष्णा ), तुला **नेहमींप्रमाणेंच** मुकुट घातलेला व हातांत गदा आणि चक्र धारण केलेला असा मी पाहूं इच्छितों. तेव्हां **नेहमींचेंच चार हातांनीं युक्त** असें रूप तूं धारण कर.

२ यावर शंका पुढील प्रमाणें येते. विष्णूला चार हात आहेत. त्याचाच पूर्णावतार कृष्ण. यालाहि चार हात सम्भवतात. परंतु भागवतादि पुराणांत, शिशुपालवधादि काव्यांत, हरिविजयादि अनेक मराठी ग्रंथांत आणि आपल्या परंपरागत समजुतींत कृष्ण नेहमीं द्विभुजच असतो. अर्थात् **तेनैव रूपेण** या शब्दांवरून **द्विभुजरूप** असाच अर्थ आपल्या मनांत येतो. परंतु येथें ' चतुर्भुजेन ' असा प्रयोग प्रत्यक्षांत आहे. म्हणजे येथें नेहमींची वहिवाट, परंपरा, कविप्रयोग, इत्यादि **द्विभुज**-चा पुरस्कार करितात, तर गीता **चतुर्भुज** असा प्रयोग करिते. हा विसंवाद येथें होतो.

३ **दोन अर्थांची तुलना**— हा **विचारोत्तर** अर्थ व आरंभीं दिलेला सामान्यतः करण्यांत येणारा दर्शनी अर्थ यांतील भेद आपण पाहूं. ( १ ) **दर्शनी** अर्थांत **चतुर्भुजेन** हें तृतीयान्त विशेषण असून त्याचें विशेष्य **रूपेण** हें आहे. आणि त्याचेपुढें **विशिष्टः** किंवा **युक्तः** असें पद अध्याहृत आहे, व ' चतुर्भुजेन रूपेण युक्तः भव ' तेंच माझ्या नित्य परिचयाचें चार हात धारण करणारें रूप तूं घे. ( २ ) **विचारोत्तर** अर्थांत–चतुर्भुजेन हा **चतुर्भुज + इन** असा दोन संबोधनांचा संधि आहे. यांत चतुर्भुज म्हणजे कृष्ण आणि **इन** म्हणजे धनी, राजा. दोहोंचा मिळून अर्थ ' कृष्ण महाराज ' ' सहस्रबाहो विश्वरूप चतुर्भुजेन, तेनैव रूपेण भव ' = सहस्रभुजधारी विश्वरूप कृष्ण महाराज, तेंच ( मला नित्य परिचित असलेलें ) रूप धारण करा.

* मंडळ वाढदिवस ३९, शा. १८७१, दि. २८-६-१९४९.

४ या दोन अर्थांतील तारतम्य—(१) **दर्शनी** अर्थांत 'चतुर्भुज' या विशेषणानें वस्तुस्थितीशीं विरोध येतो. गोकुळांत काय किंवा पांडवांच्या सहवासांत काय, कृष्ण द्विभुजच होता. तेव्हां 'चतुर्भुज रूप' हा अर्थ वरील पद्यांत असणें शक्य नाहीं. उलट **विचारोत्तर** अर्थांमध्यें भुज-संख्या मुळींच उक्त नाहीं. यामुळें लोकांत दोन हातांनीं वावरणाऱ्या कृष्णमूर्तीशीं 'तेनैव रूपेण'–चा विरोध कोणत्याहि प्रकारें येत नाहीं. तेव्हां हाच अर्थ उत्पन्न होतो. व तोच सर्वथा कवीस विवक्षित असावा, हें उघड होतें.

५ भारतांत कांहीं पद्यें (व्यास–गणेश संवाद) क्लिष्टार्थक आहेत. त्यांतील कांहींचा अर्थ कोणास बऱ्याच प्रयत्नानें लागेल, कांहींचा लागणार नाहीं, कांहींच्या अर्थाविषयीं मतभेद होईल, इत्यादि प्रकार संभवतील. अशा रीतीनें भारतांत संभवणाऱ्या कोड्यांतील एक कोडें उदाहरणासाठीं येथें घेतों.

६ **कोड्याचा नमुना**— नदीज लंकेशवनारिकेतुः
नगाह्वयो नाम नगारिसूनुः ।
एषोऽगनावेषधरः प्रमाथी
**जित्वावयन्नेष्यति** चाद्य गावः ॥

**अन्वय**—(द्रोण भीष्मास म्हणतो) हे नदीज, लङ्केशवनारिकेतुः, अद्य अङ्गना-वेषधरः, प्रमाथी एषः नगाह्वयो नाम नगारिसूनुः अवयन् वः जित्वा गाः नेष्यति ।

**अर्थ**— हे भीष्मा, रावणाच्या बागेचा विध्वंस करणारा मारुती ज्याच्या ध्वजावर आहे असा, आज स्त्री-वेष धारण करणारा, हा दांडगा, अर्जुन वृक्षाशीं तुल्य नांव धारण करणारा, इंद्राचा मुलगा तुम्हास हल्ला करून जिंकून गाई नेईल. हा विचारोत्तर अर्थ होय. याच पद्याचा **दर्शनी** अर्थ वाचकांस घोटाळ्यांत पाडणारा आहे. शेवटल्या चरणांत पदच्छेद कसा ? विभक्ती कोणती ? शब्दार्थ काय ? याविषयीं कोडेंच पडतें: (१) दर्शनी अर्थांतील पदच्छेद–जित्वा, वयं (= आम्ही), नेष्यति, च अद्य गावः ('गो'–चें प्रथमा बहुवचन) यांत 'वयं' आणि गावः' या प्रथमांची सङ्गती लागत नाहीं. (२) **विचारोत्तर** अर्थांत पुढील पदच्छेद आहे. –'जित्वा अवयन् नेष्यतिः च अद्य गाःवः'–येथें–**अवयन्**–हें 'अव–इ' 'जवळ जाणें, हल्ला करणें' चें वर्तमान विशेषण पुं. प्र. एकवचन, अर्थ 'हल्ला करणारा' गाः (द्वि. ब. व.), वः ('युष्मत्'चें द्वि. ब. व) येथील पदें (१) वरवर पाहूं जातां जित्वा, वयं, नेष्यति, च अद्य गाव अशीं वाटतात. पण (२) विचारान्तीं ती जित्वा, अवयन्, नेष्यति च अद्य गाः व अशीं ठरतात. या द्विविध पदसङ्घाचें श्रवण संधि केल्यावर सारखेंच होतें. वयं + नेष्यति = वयंनेष्यति, किंवा **वयन्नेष्यति**–यांतील उत्तरोक्त संधिरूप दोन्ही अर्थांस सामान्य आहे. यामुळें हें संधिरूप (वयन्नेष्यति) वरवर पाहिल्यास, सामान्य वाचकांस घोटाळ्यांत पाडितें; पण बारकाईनें पाहिल्यास पण्डितास सुसंगत अर्थ सांगतें. याप्रमाणें वरवर अर्थ एक व विवक्षित अर्थ दुसरा अशी व्यवस्था भारतांत मधूनमधून आढळते.

हाच प्रकार आपल्या प्रस्तुत पद्यांत आहे. त्यांतील विचारोत्तरार्थानुरूप पाहतां, येथें कृष्णानें चार हात धारण केले नाहींत, हें उघड होतें.

७ **संबंधित विविध शब्दप्रयोग**—पद्य ४६ मध्यें–**तथैव तेनैव रूपेण,** पद्य ४९ मध्यें–( कृष्ण म्हणतो ), " **तदेव** (मे रूपमिदं प्रपश्य ), ' ५० मध्यें **स्वकं रूपं** ५१ मध्यें ( दृष्टेदं ) **मानुषं रूपं** ( तव सौम्यं जनार्दन ) या सर्व ठिकाणीं **तथैव** = नेहमींप्रमाणें, **तेनैव, तदेव** = नेहमींचें **स्वकं रूपं** = आपलें रूप; **इदं मानुषं रूपं** = माणसाप्रमाणें ( दोन हातांचें ) हें रूप. या सर्व उल्लेखांवरून दिसतें कीं–अर्जुनानें **नेहमींचें** रूप मागितलें. तदनुरूप कृष्णानें **आपलें रूप** दाखविलें. आणि हें **मनुष्या-सारखें रूप** म्हणून, अर्थात् दोन हातांचें असें, अर्जुनानें वर्णिलें. यावरून कृष्णानें सहस्रभुज रूप टाकून द्विभुज रूप धारण केलें, मध्यंतरीं चतुर्भुज रूप दाखविलें नाहीं, हें उघड होतें. आतां या अर्थावर येणाऱ्या आक्षेपांचा विचार करूं.

८ **यौगिक व रूढ अर्थ**—एतत्संबंधित पद्यांत कृष्णाचा उल्लेख ' चतुर्भुज ' या शब्दानें केलेला आहे. यावरून कोणी अशी शंका घेईल कीं या ' चतुर्भुज ' पदा-नुसार कृष्णानें हजार भुज टाकून ' चार भुज ' धारण केले असावे. तरच **चतुर्भुज** ही संज्ञा **चरितार्थ** होईल. **यावर उत्तर**–' उपेन्द्र इंद्रावरजः चक्रपाणिः चतुर्भुजः ' या कोशावरून चतुर्भुज ही विष्णूची म्हणजे कृष्णाची **संज्ञा** ठरते. विष्णुरूपामध्यें ती चरितार्थहि होते. विष्णूला भुज चार असल्यानेंच चतुर्भुज हें नांव त्यांस मिळालें आहे. येथें लक्षणीय कीं, कांहीं कारणांवरून एकदां पडलेलें नांव, तें कारण विद्यमान नसतांहि, योजण्यांत येतें. लहानपणीं व्रात्यपणामुळें कृष्णास यशोदेनें, त्याच्या **उदरास दामन्** म्हणजे दावें बांधून, त्यानें उखळीशीं जखडून टाकिलें. या घटनेवरून त्यास '**दामोदर**' नांव पडलें; व हें नांव पुढेंहि त्याचें नित्याचें ठरलें. विष्णूस **चक्रपाणि** कां म्हणतात ? **उत्तर**–तो **पाणि**–मध्यें म्हणजे हातामध्यें चक्र धरितो म्हणून. पण ही चक्रपाणि संज्ञा आपण त्यास नेहमींच लावितो, मग त्याच्या हातांत चक्र असो वा नसो. **गोडबोले** नांवाचा गृहस्थ सामान्यतः गोड बोलत असल्यानें, त्यास हें नांव पडलें. तरी पण एकदां पडलेलें हें नांव, तो कडू बोलला, त्यानें शिव्या दिल्या, किंवा तो कांहींच बोलला नाहीं तरी, आपण त्यास नेहमीं लावितो. यावरून दिसतें कीं एखादी संज्ञा किंवा नाम कोणास पडलें तेव्हां तें **चरितार्थ** असतें. पण पुढें तें प्रायः अर्थ – निरपेक्ष त्यास योजण्यांत येतें. म्हणजे संज्ञा प्रवृत्तिकालीं चरितार्थ असतें; तिचा अर्थ अवयवार्थास अनुसरून असतो; तर पुढें तो अर्थ सुटून, ती केवळ रूढ अर्थानें वापरण्यांत येते.

९ अशाच प्रकारें येथें चतुर्भुज ही **केवळ संज्ञा** आहे. अर्थात् हा शब्द येथें साभिप्राय घ्यावयाचा नाहीं. तेव्हां त्याचा अर्थ केवळ कृष्ण एवढाच आहे. त्यावरून हस्तसंख्येविषयीं अनुमान काढावयाचें कारण नाहीं, तेव्हां चतुर्भुजेन = कृष्णमहाराज.

अर्जुनानें कृष्णास नेहमीचें रूप धरण्यास सांगितलें आणि त्यानें तदनुरूप द्विभुजरूप धारण केलें.

१० हें अर्थ-साधन कांहीं पण्डित मान्य करीत नाहींत. त्यांच्या मतें सहस्रभुज रूपानंतर कृष्णानें प्रथम चतुर्भुजरूप धारण केलें व नंतर द्विभुजरूप घेतलें. या मताच्या सिद्धीसाठीं ते पुढील प्रमाणें देतात. या प्रमाणांचा आतां आपण विचार करूं.

**प्रमाण १** अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा
भयेन च प्रव्यथितं मनो मे ।
तदेव मे दर्शय **देव रूपं**
प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ११, ४५,

येथें **देवरूपं** म्हणजे देवाचें रूप, अवतारकालीन चतुर्भजरूप, असा अर्थ होतो. देवस्य रूपं = देवरूपं असा समास येथें विवक्षित आहे. **या प्रमाणास उत्तर**–याच पद्यांतील '**तदेव**'चा अर्थ उघडउघड तेंच म्हणजे **नित्य परिचित** (द्विभुजरूप) असा आहे. तेव्हां देवरूपं यानें चतुर्भुज रूप असा अर्थ घेतां येत नाहीं, आणि अशा अर्थाचे अभावीं **देव** हें समासपद न करतां संबोधन घेणें प्राप्त होतें. **प्रमाण २**–देव रूप अशीं व्यस्त पदें घेतल्यास, **देव** हें संबोधन घ्यावें लागेल; व याच पद्यांत **देवेश** हे तुल्यप्रायार्थक संबोधन असल्यानें, पुनरुक्तता दोष उत्पन्न होईल. तो टाळण्यासाठीं **देवरूप** असा समास-शब्दच घेणें येथें योग्य आहे व त्यानें चतुर्भुजरूपच सूचित होतें. यास उत्तर—देव-पासून रूपं पृथक् केल्यास देव हें संबोधन घ्यावें लागतें व तें देवेश याचे अर्थास प्रायः **पुनरुक्त** अत एव निरर्थक करितें. हें सत्य असलें तरी पुढील विचारानें येथील देव ह्या संबोधनानें होणारी तेथील एक प्रकारची द्विरुक्ति इष्टच ठरते. या पद्यांत अर्जुन काकुळतीस येऊन कृष्णाजवळ सौम्यरूपाची याचना करीत आहे. तींत त्यास प्रथम **देव** असें संबोधून, पण तत्क्षणीं तेवढ्यानें समाधान न मानून, पुढें लगेच **देवेश** असें संबोधित आहे· देव-हून देवेश-मध्यें गौरव अधिक आहे; व हें वाढतें गौरव 'प्रसीद' इत्यादि शब्दांनीं गयावया करणाऱ्या अर्जुनाच्या भाषेस साजेसेंच आहे. तेव्हां 'देव' हें रूप व्यस्त करून संबोधन घेणें अनिष्ट नसून, उलट प्रकृत संदर्भास पोषकच असल्यानें, सर्वथा ग्राह्य ठरतें.

**प्रमाण ३**

इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा
स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।
आश्वासयामास च भीतमेनं
भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ ११, ५०.

**अन्वय**—'तथा' इति महात्मा वासुदेवः अर्जुनं उक्त्वा, भीतं एनं स्वकं रूपं

भूयः दर्शयामास । पुनः च सौम्यवपुः भूत्वा आश्वासयामास. **अर्थ**– ' बरें ' असें अर्जुनास बोलून महात्मा कृष्ण यानें भ्यालेल्या अर्जुनाला आपलें रूप पुन्हां दाखविलें. आणि फिरून शांत रूप धारण करून अर्जुनाची भीति त्यानें नाहींशीं केली.

या अर्थांत **आपलें रूप** ( स्वकं रूपं ) यानें चतुर्भुज रूप सूचित होतें; आणि पुढील **सौम्यवपुः** या शब्दानें द्विभुजरूप सूचित होतें. तेव्हां अर्जुनाच्या ' चतुर्भुजेन रूपेण ' इत्यादि विनंतीनुसार कृष्णानें कांहीं काल चतुर्भुजरूप धारण केलें, ही गोष्ट सिद्ध होते.

**यास उत्तर--स्वकं रूपं** याचा अर्थ गोकुळांतील बालपणापासूनचें रूप म्हणजे द्विभुजरूप असाच होतो. विष्णूशीं अभेद मानून विष्णूप्रमाणें चतुर्भुजरूप **स्वकं रूपं** या पदांनीं घेण्याचें कारण नाहीं. एतदनुकूल निर्दोष अन्वय पुढीलप्रमाणें सहज प्राप्त होतो. **अन्वय**– ' तथा ' इति महात्मा वासुदेवः अर्जुनं उक्त्वा, पुनः सौम्यवपुः भूत्वा, भीतं एनं स्वकं रूपं भूयः दर्शयामास, आश्वासयामास च, **अर्थ**– ' बरें ' असें महात्मा कृष्ण यानें अर्जुनास म्हटलें व फिरून शांत रूप धारण करून, भ्यालेल्या त्याला आपलें ( नेहमींचें ) रूप पुनरुपि दाखविलें व त्यास धीर दिला.

या अर्थांत विश्वरूप-विसर्जनानंतर एकाच रूपाची, अर्थात् **द्विभुज** रूपाचीच प्राप्ति संभवते.

**प्रमाण ४**-- सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।
देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥ १०, ५२

**अर्थ**— ( विश्वरूप टाकल्यावर कृष्ण अर्जुनास म्हणतात– ) त्वां पाहिलेलें हें माझें रूप भक्तांच्या दृष्टीस पडणें फार **विरळा** संभवते, देवसुद्धां हें रूप पाहण्याची नित्य इच्छा करितात. अर्थात् हें देवांचें इष्ट रूप भयंकर सहस्रभुज असें नसून, तें अल्प-कालीन **चतुर्भुज** असलें पाहिजे.

**यास उत्तर— देव** नेहमीं पाहूं इच्छितात, एवढ्यावरून तें नियमानें घोर **नसलेंच पाहिजे**, असें म्हणतां येत नाहीं. घोर, भयानक असेंहि रूप पाहण्यास आपलें मन कधींकधीं सिद्ध होतें. याच मनःप्रवृत्तीमुळें काव्यांत **भयानक रस** साधण्यांत येतो व तो आपणांस तेथें मनोहरहि वाटतो. वाघ पाहिला असतां आपलें मन कंपित होतें; तरीपण तो पाहण्यास आपण उत्सुक असतों. त्याच्या दर्शनापासून होणाऱ्या आनंदांत भयाचें मिश्रण असतें. प्रस्तुतांत अशा आनंदाचे जोडीस, पूज्यत्व व पावनत्व हेहि धर्म आहेत. सारांश– भयमिश्र असाहि आनंद आपणांस आवडतो. एतदनुसार या उग्र विश्वरूपा-संबंधानें देवांनीं दर्शनकांक्षी असणें यांत विपरित असें कांहींच नाहीं. तेव्हां या पद्यांतील रूप मनोहर चतुर्भुज न घेतां, उग्र विश्वरूप घेणें मुळींच तर्क-विरोधी नाहीं.

प्रस्तुतांतील **घटना-सांखळीचे दुवे**-- कृष्णाचें उग्र असें विश्वरूप पाहून

अर्जुन **घाबरला,** व त्याला हें रूप नाहींसें होऊन शांत असें कृष्णाचें रूप मी केव्हां पाहीन असें झालें. ही गोष्ट--

अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा
भयेन च प्रव्यथितं मनो मे । ११, ४५.

यावरून दिसून येतें. हें साधण्यासाठीं त्यानें कृष्णास नित्यपरिचित असें सौम्यरूप दाखविण्याची विनंती केली. ही गोष्ट—

तदेव मे दर्शय देव रूपं (४५) या चरणांत सांगितली आहे. ही अर्जुनाची **प्रार्थना** ऐकून कृष्णानें तिचा **स्वीकार** केला. हें आपण—

व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं
तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ११, ४९

या उत्तरार्धांतील कृष्णोक्तीवरून पाहतो. याप्रमाणें बोलून कृष्णानें अर्जुनाच्या प्रार्थनेची **पूर्तता** केली. ही गोष्ट—

स्वकं रूपं दर्शयामास भूयः । ११, ५०

अशी चरण २ मध्यें वर्णिली आहे. आपली प्रार्थना कृष्णानें पूर्ण केली, व त्यामुळें आपली भीति उडून गेली व आपल्या जिवांत जीव आला, असें पुढील पद्य ५१ मध्यें बोलून, अर्जुन कृष्णरूपेचें **स्वागत** करीत आहे.

दृष्ट्वेदं मानुषं रूपं......
......सचेताः प्रकृतिं गतः ॥

यानंतर मानुषरूपापूर्वी असलेल्या **उग्ररूपा**विषयीं कृष्ण पुढीलप्रमाणें बोलत आहेत.

तूं आत्तांच पाहिलेलें हें रूप पाहण्यास फार दुर्मिळ आहे, हें देवांनासुद्धां वारंवार दिसत नाहीं. हें पाहण्याविषयीं ते नेहमीं उत्सुक असतात. हें रूप वेदाभ्यास, तपश्चरण इत्यादि साधनांनींसुद्धां पाहवयास सांपडणें कठीण (पद्यें ५२, ५३).

वर सांगितलेलें सांखळींतील दुवे म्हणजे मूळ अर्जुनाची घबराट, तदनुसार त्यानें केलेली कृष्णाची प्रार्थना, कृष्णानें केलेला तिचा स्वीकार, नंतर आपलें रूप दाखवून प्रार्थनेची केलेली पूर्तता, ती पाहून 'माझें समाधान झालें' इत्यादि अर्जुनाची मान्यता, या सर्व दुव्यांची एकवाक्यता असली पाहिजे. पैकीं अर्जुनाच्या मान्यतेंत 'इदं मानुषं रूपं' असा स्पष्ट उल्लेख आहे. यावरून अर्जुनानें पाहिलेलें रूप (मनुष्योचित म्हणजे) **द्विभुज** होतें, ही गोष्ट संशयातीत आहे. अर्थात् या गोष्टीस अनुसरूनच पद्य ४६ मधील 'चतुर्भुजेन' चा अर्थ केला पाहिजे. असा संवादी अर्थ 'चतुर्भुज' हें कृष्णाचें संबोधन घेतल्यानेंच साधतो.

शिवाय, अर्जुनानें समाधान व्यक्त केल्यानंतर कृष्ण म्हणतात, "हें माझें रूप

कोणासहि पाहण्यास फार दुर्मिळ आहे." इ. हें रूपाचें वर्णन (पद्य ५३) पद्य ४८ तील वर्णनाची केवळ नक्कल आहे. पैकीं पद्य ४८ त वर्णिलेलें रूप विश्वरूपत्यागाच्या पूर्वीचें असल्यानें निःसंदिग्ध विश्वरूप आहे. अर्थात् तुल्य वर्णिलेलें पद्य ५२, ५३ मधील रूपहि तेंच असलें पाहिजे. यावरून अर्जुनाच्या मान्यतेनंतर कृष्ण म्हणतात, "तूं पाहिलेलें हें माझें रूप दृष्टीस पडणें फार कठीण आहे." इत्यादि वर्णन विश्वरूपासच लागूं होतें. तेव्हां मानुषरूप धरण्यापूर्वीं कृष्णानें सोडलेलें रूप विश्वरूपच होय, त्यानें विश्वरूप टाकिलें व तत्क्षणीं मनुष्यासारखें द्विभुजरूप धारण केलें. ही वरील घटनांची संगति पाहतां, विश्वरूप व तदनंतरचें द्विभुजरूप हींच दोन रूपें आपण या व्यवहारांत पाहतो. यांत चतुर्भुजरूपाचा कोठें मागमूसहि नाहीं. हेंच म्हणणें सरळ सांगणें तर असें सांगतां येईल.

विश्वरूप पाहून घाबरलेल्या अर्जुनानें कृष्णास उग्र विश्वरूप टाकून नेहमींचें शांत रूप धरण्यास सांगितलें. 'हें रूप पहा' असें म्हणून कृष्णानें आपलें रूप दाखविलें. या दाखविलेल्या रूपाचें स्वागत 'हें तुझें मनुष्य सदृशरूप पाहून' इत्यादि शब्दांनीं अर्जुनानें केलें. यावर कृष्ण म्हणाले, "मनुष्यरूपापूर्वीं त्वां पाहिलेलें माझें विश्वरूप हें मोठ्या भाग्यानें व पुण्याईनेंच दृष्टीस पडावयाचें." या सर्व व्यवहारांत विश्वरूपाच्या विसर्जनानंतर कृष्णानें पाठोपाठ द्विभुजरूपच धारण केलें, हें उघड होतें.

**११ मतांतर विचार** (१) कोणी म्हणतात कुरुक्षेत्रावरील व इतर ठिकाणच्या पांडवांशीं घडलेल्या, कृष्णाच्या व्यवहारांत तो चतुर्भुजच होता. तेव्हां चतुर्भुजेन रूपेण यानें चतुर्भुजरूपाचेंच ग्रहण होतें. या मतासंबंधीं एवढेंच म्हणणें पुरें आहे कीं (क) कृष्ण चतुर्भुजरूपानें पांडवांशीं वागत होता, याला भारतादि ग्रंथांत मुळींच आधार नाहीं, शिवाय (ख) व्यवहारांत कृष्ण चतुर्भुज असतां तर त्याचें ईश्वरत्व कौरवांसहि सर्वथा पटून त्याचें आश्रित असलेल्या पांडवांविरुद्ध ते युद्धास उभेच राहिले नसते. तेव्हां हें मत सर्वस्वीं निराधार व तर्कदुष्ट म्हणून त्याज्य. (२) कोणी म्हणतात- अर्जुनानें कृष्णास विश्वरूप टाकून जें रूप धारण करावयास सांगितलें तें **ध्यानरूप** होय. देवाचें ध्यान करतांना अर्जुन, भक्त या नात्यानें, विष्णूची चतुर्भुज मूर्ति मनश्चक्षूपुढें ठेवीत असे. हीच **चतुर्भुज मूर्ति** धारण करण्यास यावेळीं अर्जुनानें कृष्णास प्रार्थिलें. **या मतास उत्तर--** विश्वरूप पाहून अर्जुन घाबरला. यांतून मुक्त होण्यासाठीं त्यानें **सौम्य रूपाची** मागणी केली. हें रूप समरभूमीवर पहावयाचें आहे. अर्थात् या रूपाशीं ध्यानमूर्तीचा संबंध असण्याचें कांहींच कारण नाहीं. तेव्हां विश्वरूपोत्तर **द्विभुज** असेंच रूप कृष्णानें धारण केलें, हें उघड होतें.

(३) तिसरें आणखी मत असें आहे, कीं अर्जुनाच्या विनंतीनुसार कृष्णानें विश्वरूप टाकून कांहीं काळ चतुर्भुजरूप धारण केलें, व नंतर द्विभुजरूप धरिलें. हें

म्हणणेंहि सुसंगत नाहीं. अर्जुनाच्या शांतरूपाच्या मागणीनुसार कृष्णास रूप धारण करणें प्राप्त होतें. तें त्यानें धारण केल्यावर, त्याच रूपाचें अर्जुन स्वागत करणार. अर्जुनाच्या स्वागतांत 'मानुषं रूपं' असे शब्द स्पष्ट आहेत. अर्थात् विश्वरूपानंतर अर्जुनाच्या प्रार्थनेनुसार **मानुषरूप** म्हणजे द्विभुज असेंच रूप कृष्णानें धरिलें असलें पाहिजे. यांत मध्यंतरीं चतुर्भुजरूप धारण केलें जाण्याचें कांहींच प्रयोजन उपलब्ध होत नाहीं. करितां अर्जुनाची विनंती द्विभुजरूपाबद्दल होती, तिची पूर्तता द्विभुजरूप घेऊन कृष्णानें केली व याच द्विभुज रूपाचेंच स्वागत अर्जुनानें केलें हें उघड होतें.

**१२ निगमन**-- याप्रमाणें (१) 'तेनैवरूपेण चतुर्भुजेन' हा चरण धारण करणारें पद्य व्यासरुत एक कूट-पद्य आहे, अशीं कूट-पद्यें महाभारतांत व म्हणून तदंगभूत गीतेंतहि आहेत. (२) सहस्रभुजरूप टाकून द्विभुजाचे पूर्वीं कृष्णानें चतुर्भुजरूप धारण केलें नाहीं. (३) 'चतुर्भुज' या शब्दाचा यौगिक अर्थ येथें येण्याचें कारण नाहीं. हा शब्द येथें केवळ रूढ अर्थानेंच घ्यावयाचा आहे. (४) तथैव, तेनैव, तदेव, स्वकं रूपं, मानुषं रूपं इत्यादि पदांनीं कृष्णाच्या सर्व सहवासी लोकांस नित्यपरिचित असें द्विभुज-रूपच विवक्षित आहे. (५) ४५ च्या पद्यांतील **देव** व नंतर आलेले **देवेश** हीं दोन संबोधनें अर्जुनाच्या वाढत्या करुण अवस्थेस पोषकच असल्यानें यथास्थान योग्य ठरतात.

तेव्हां वरवर विरोधी भासणाऱ्या 'चतुर्भुजेन' या रूपाचा अर्थ द्विभुजरूपास विरोधी होणार नाहीं अशा रीतीनेंच केला पाहिजे. तेव्हां येथें चतुर्भुजेन = चतुर्भुज इन (कृष्णमहाराज) असेंच घटक घेणें प्राप्त आहे.

(७) चतुर्भुजेन-चा पदच्छेद-चतुर्भुज इन असा होतो. 'इनः सूर्ये प्रभौ' (राजा) या अमर कोशानुसार **इन** हा **प्रभु**-वाचक शब्द आहे, तृतीया एकवचनी प्रत्यय नाहीं. 'चतुर्भुजेन, तैनेव रूपेण भव' = कृष्णमहाराज, आपलें नेहमींचेंच (द्विभुज) रूप धारण करा' असाच अर्थ येथें घेणें सर्वथा उपपन्न होतें. यावरून **इत्यर्थ** हाच कीं (क) विश्वरूप टाकल्यावर कृष्णानें पाठोपाठ नेहेमींचें द्विभुज रूपच धारिलें. (ख) चतुर्भुजेन हें संबोधन असून, त्याचा अर्थ कृष्णमहाराज असा आहे. (ग) कृष्णाजवळ अर्जुनानें चतुर्भुजरूपाची मागणी केली नाहीं व त्यानेंहि विश्वरूपानंतर चतुर्भुजरूप घेतलें नाहीं. तो नेहमींप्रमाणें द्विभुज झाला अशा प्रकारें. **चतुर्भुजेन रूपेण** या कोड्याचा उलगडा मी केला आहे. हा विद्वानांस रुचेल अशी अपेक्षा करितों.

---

# १४ उपाध्ये यांनीं घड्याळ वाजवावें

( श्री. भी. ल. परतूडकर, परभणी )

*हैद्राबाद राज्यांतील परभणी जिल्ह्यांतील तालुक्याचें ठिकाण परतुड येथील श्री. वामन अनंत पाठक यांच्या संग्रहीं प्रस्तुतचें निवाडापत्र मिळालें. कागद जाड असून पत्र काळ्याभोर शाईनें वळणदार मोडी अक्षरांत लिहिलेलें आहे. पत्राचा काल ११७५ फसली हा आहे.

प्रस्तुत पत्रांतील महत्त्वाची गोष्ट म्हणजे बाहद्दर दुलुल्ला या नव्या दिवाणानें काढलेला एक अजब हुकूम ही होय. ' गांवांत चार उपाधे असतां घड्याळचीची दरकार काय—प्रत्येकानें एकेक प्रहर घटका वाजवाव्या ' हा तो हुकूम.

प्रारंभीं एक वर्तुळाकृति फारसी व दुसरी पिंपळपानाच्या आकाराची मराठी अशा दोन मुद्रा आहेत.

प्रस्तुतचें निवाडापत्र ' सुरते मजालिस'च्या प्रकाराचें असून यावेळचें ' शरीयत पन्हा ' काजी. महमद हसन ' हे असून ' हुकमत—पन्हा ' जागीरदार श्रीमंत राजश्री राव अभीमनजी खंडागळे हे होते. जोशीपणाच्या भांडणाची शहानिशा करण्यासाठीं अदालत भरली. त्यांत पाठक व रुग्वेदी उपाधे ( म्हणजे सध्यांचे ' वरसाले ' ) यांनीं गाऱ्हाणें मांडलें कीं बाबू जोशी आमचें जोशीपण खातो. बाबू जोशीनें त्यांना सनदा दाखविण्यास सांगितलें. त्यांत त्याच्या वडिलाचें नांव होतें. तसेंच मागें झालेलें घटका—प्रकरणहि होतें, तें असें:—

चौघा उपाध्यायांनीं चार प्रहर घटका वाजवाव्यात ह्या दुलुल्ला दिवाणच्या हुकमावरून त्या चौघांना, पाठक, जोशी, रुगवेदी उपाध्ये ( = वरसाले ) व सेंडगे यांना, चावडीवर बोलावून आणिलें. जोशी व सेंडगे यांनीं घटिका वाजविण्याचें कबूल केलें. पाठक व वरसाले यांनीं नाकबूल केलें, यावरून त्या दोघांना कैदेंत टाकलें. सात दिवस झाल्यावर लोकांनीं मध्यस्थी केली व ९२ होन दंडावर दोघांची सुटका झाली. परंतु पाठक व रुग्वेदी उपाध्ये ( वरसाले ) यांच्याजवळ नगदी होन नव्हते. म्हणून पाठक यांनीं आपल्या उत्पन्नाचा तिसरा हिस्सा व रुग्वेदी उपाध्ये ( वरसाले ) यांनीं आपल्या उत्पन्नाचा निम्मा हिस्सा जोशी यांजकडे गहाण टाकला. जोशी यानें आपणांस दोघांचें उपाध्येपण दिल्यास आपण तीनहि प्रहर वाजवितों असें कबूल केल्याबद्दलचाहि एक पुराव्याचा दुसरा कागद परतुड येथील श्री. देशपांडे यांच्या संग्रहांत सांपडला असून त्याची नकलहि सोबत जोडली आहे.

---

* पा. स. १।७७. सभेपुढें मूळ कागद मांडण्यांत आला नव्हता. निबंध लेखकांकडून नक्कल आली तशीच येथें दिली आहे. —सं.

बरेच दिवस वरील गहाणांतील उपाध्येगिरीचें उत्पन्न खाल्ल्यावर पुढें भरलेल्या अदालतीचें वरील प्रमुख निवडापत्र आहे. बावीस होनांची भरपाई झाली असून आतां यापुढें सर्वांनीं आपापलें जोशीपण करावें असा यांत निवाडा आहे.

(श. १६८७ मार्ग. शु. ७ = इ. १७६५ नोवें. १९)

شريف – شرع – خادم قاضی عبدالحسن (आकार वर्तुळी)

سبت عندي هكذا

० श्री ‿ । परम पावन । प राजत्र । धा गजपतराज । जीव हिण ।

(आकार पिंपळपानाचा ओळी ५)

सुरते मजालिस बहुजूरे अरबाब अदालत बतारीक छ ५ रो माहे जमादिलाखर

शरीयत पन्हा काजी महमद हसन

हुकूमत पन्हा जागीरदार श्रीमंत राजश्री राव अभीमनजी खंडागले

देशमुख व देशपांडिये

माहजन व मोकदम व पटवारी व शेटे माहजन व खुमदार लोक व बलुते

बो आबदूल रसूल देशमुख पा मजकूर बो देसपाडींचे पा मजकूर

(कागदाच्या डाव्या बाजूवर आडव्या सह्या)

पा पडतुर सरकार जालहनापूर सुबे खुजस्ते बुनीयाद सुा सन ११७५ अकरासे पच्याहतर मुतचिक सन (मो.जा.) जलूसवाला कारने सूरत मजालस बैसा जे बो भवानी वलद सोयरावा व सदासीव वलद माहदेव व गोवींद वलद धोडावा व चींतामन वलद नरसावा वगैरे पाठक येजुरवेदी व यज्ञेश्वर वलद माहदेव व रामभट वलद शामभट व भीकू वलद आपा व शामभट वलद आनंतभट वगैरे उपाधे रुगवेदी यानी येऊन आदालतीमधे फीरयाद केली की आपले जोसेपनाचे वतन कदीमलआयाम कसबे मजकूरी आसता बाबू वलद रामभट आपले वतन जोसेपन खातो त्याजवरून बाबुभट मजकुरास हजूर बोलावून पुरसीस केली की याचे वतन जोसेपन आसता तुजला वतन खायास दरकार काय त्यास बाबु मजकूर यानी जाहीर केले की पाठक यजुरवेदी व उपाधे रुगवेदी वतनाचा दावा आपनासी कोने सनदेवर करीतात हर दो जनाची मुनसफी मजालसीमधे करावी आपन राजी आसो त्याजवरून पाठक येजुरवेदी व उपाधे रुगवेदी याजला पुरसीस केली त्यानी जोबसाल केला जे आपनापासी बाबु मजकूर याचे वडीलाचे नावे लिहिले आहे मग आदालतीमधें हुकुम केला की तुम्हां जवल लिहिले कैसे आहे ते आनून दाखवने त्याजवरून मुनसफी केली जाईल मग पाठक यजुरवेदी व उपाधे रुगवेदी याजपासी बाबूभट याचा वडील येबा जोसी घीरादर कोडजोसी याचे नावाचे लिहीले बमोहर राजेश्री ढुलाजी राजे जाधवराव व्होते ते आनून आदालतीमधे गुजराबले त्याजवरून सभा करोन हली मवाली बैसोन सदरहू लीहीली याची मुनसफी केली त्यास कसबे मजकूरचे जोशपन मुदामत कदीमलयाम काछीवर पाढरी वसली त्या

दीवसापासोन कसबे मजकूरचे जोसेपन चव तरफा च्यार घटका असे व मेडी सात चालत आल्या दरमीयान नवा दीवान बाहद्दर दुलुला आला त्यानें नवी कानु केला की ज्या गावात चवघे जन जोसी घटका घालीत आहेत सरकारात घडाळची याची दरकार कासीयास पाहीजे चवघे जोसी च्यार प्रहर वाजवीतील म्हनऊन हुकूम केला मग पाठक येजुरवेदी व उपाधे रुगवेदी व येबा जोसी बीरादर कोडजोसी व सेडगे या चवघास नेऊन बैसवीले की चवघेजन जोसी च्यार प्रहर वाजवन थैसीयास येबा जोसी व सेडगे या दोघांनी दोन प्रहर कबूल केले येजुरवेदी पाठक व रुगवेदी उपाधे हे दोघे जन कबूल करीनात म्हनऊन दोघास कैद केले पाच सात दीवस कैदेमधे व्होते नीदान लोक मधेस्त व्होऊन बावीस व्होन हक्रमाची गुन्हेगारी ठरवीली या देयास मवसर नाही मग आपले वतन जोशेपन पैकी येबा जोसी याजपासी गाहन ठेविले दोघाही व्होन घेऊन सरकारात दीधले बीतपसील कसबा बमचे पेठा पुरे

पाठक येजुरवेदी व्होन बारा

१२

सदरहू यास यैवज गाहन जोशेपन पैकी ठेवीले याचा तपशील

१ येजुरवेदी व कानव याचे घरचे हक

१ लग्नपत्रीका

१ लग्नघटका

१ वागनीश्चे व खंड दरोबस्तपैकी हीसा तीसरा गाहन ठेवीला बाकी दोन हीसे पाठक यानी घ्यावे

३

१ सोनार व वैश याचे घरचे उत्पन पाढरीचे गाहन ठेवीले

३ मेडी ३ तीन याचा तपसील

१ माली व उबाले व काले काली-पाढरीचे हक घेने

१ आसनदास याचे मेडीचे कुनभी काली पाढरीचे हक घेने

१ लोढे मेडी येक याचे कुनभीयाचे हक घेने

३

१ तेलीयाचे खुम याचे घरचे हक

उपाधे रुगवेदी व्होन दाह

१०

सदरहू यास यैवज गाहन जोशेपन पैकी ठेवीले याचा तपशील

१ रुगवेदी व आपस्तंभ यांचे घरचे हक

१ लग्नपत्रीका

१ लग्नघटका

१ वागनीश्चे व खंड दरोबस्तपैकी नीमे गाहन ठेवीले बाकी नीमे उपाधे यानी घ्यावे

३

१ सेळके मेडी येक याचे कुनभीयाचे घरचे हक काली व पाढरी गाहन ठेवीले आसे

सदरहू वतन जोशेपनपैकी येचा जोसी याजपासी गाहन ठेवीले त्या दीवसापासोन जोसी मजकूर वतनाची कमावीस गाहना बाा तकसीमा दोन व जोसी मजकूर तकसीम येक येकून तकसीमा तीन कमावीस करु लागला सेडगे बोरवल याची खुम चालऊ लागले सदरहू लिहिलेपासून आदालतीमधे मुनसफी केली तो येजुरवेदी पाठक व रुगवेदी उपाधे याचे वतन जोशपन करारवाकइ आसे बाबूजी व कोनेरी व भीकु व केशव वलद राम जोसी याजला सागीतले की तुम्ही याचे वतनाचा भोगवटा बहूत दीवस खाला आता याचे वतन जोशपन याचे हवाले करने मग जोशी मजकूर यानीही कबूल केले की आमचे व्होन आम्हास आदा जाले गाहना बाा जोशपनाचा भोगवटा बहुत दीवस आपन घेतला आजी सबब आमचे व्होन आपन भरून पावलो त्याचे वतन त्याजला दीधले आसे जोशेपन वतन परंमपरा आहे वतनाचा बीतपसील च्यार तरफा घटका च्यार याचा तपसील कसबा बमये पेठा पुरे

यो भवानी वलद सोयेरावा व सदासीव वलद माहदेव गोविंद वलद धोंडीबा व चीतामन वलद नरसावा वगैरे पाठक येजुरवेदी याचे जोसेपन

१ येजुरवेदी व कानव याचे घरचे हक आवघे

१ सोनार व वैशे याचे उत्पन पाढरीचे आवघे

मेडी ३ तीन

१ माली व उबाळे व काले काली–पाढरीचे हक आवघे बमचे बलुते

१ आसनदास याचे मेडीचे कुनभी काली व पाढरीचे हक आवघे बमचे व बलुते

१ लोढे मेडी येक याचे कुनभीयाचे हक आवघे काली व पाढरी बमचे बलुते

---

३

१ तेलीयाचे खुम याचे हक आवघे

---

१

येझेश्वर वलद माहदेव व रामभट वलद शामभट व भीकभट वलद आपा भट व शामभट वलद आनंतभट वगैरे उपाधे रुगवेदी याचे जोशेपन

१ रुगवेदी व आपस्तंभ याचे घरचे हक अवघे

१ सेळके मेडी येक याचे कुनभी हक काली व पाढरीचे आवघे बमये बलुत

---

२

बाबू व कोनेरी व भीकु व केशो वलद रामजोशी याचे जोशेपन

१ पोवार मेडी काली व पाढरीचे कुनभी हक आवघे बमये बलुते

१ धनगर मेडी येक काली व पाढरीचे कुनभी हक आवधे बमये बलुते

१ जींगे कालीच पाढरीचे कुनभी हक आवघे बमये बलुते

बाँ बहीरव वलद हरभट व रघुनाथ वलद बालम भट वगैरे सेडगे याचे जोसेपन

खुम बोरवळ हक आवघे

१

| | | | |
|---|---|---|---|
| १ साली | १ रंगारी | १ जीनगर | १ हटगर कोस्टी |
| १ भोई | १ सुतार | १ लोहर | १ कुभार |
| १ बरढी | १ वारीक | १ चाभार | १ डोहर |

सदरहू प्रमानें जोशेपन आपले आपले हिसे प्रमान कमावीस करून लेकराचे लेकरी आवलाद व आफलाद जोशपनाचे वतन खात जाने कोन्हाचे तालुकीयामधे कोन्हाचा तालुका राहिला नाही आपलाले जोशेपनाचे तालुकीयाची कमावीस करून खात जाने गाहना बाा व्होन याचा तागादा काही राहीला नाहीं सानीन हल जोसी मजकूर याचा वारीसदार कोन्ही तगादा करील तर बातल आसे जो कोन्ही हिला-हरकत करील तो हकमाचा गुन्हेगार व गोताचा खोटा व सूरत मजालस लिहिला सही बकलम कमळाजी जनार्धन गुमास्ते देशपाडीये पा मजकूर

सहि बापु वलद राम जोसि कसबे मचुर (बाळबोध)

गौही

बगाजी माहाजन कजबे मजकूर

अत्माजी माहाजन

भोवन देवराखे (बाळबोध)

मायाजि दिक्षित (बाळबोध)

प्रयाग दाजी (बाळबोध)

सीवबा कोनार्डे (बाळबोध)

रामचंद्र आकोत (बाळबोध)

# १५ फिट्सूत्रें

( ले.– **सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, पुणें** )

* **बहिरङ्गः**– फिट् म्हणजे प्रातिपदिक. प्रातिपदिकांचे स्वाभाविक असणारे उदात्त, अनुदात्त व स्वरित हे स्वर सांगण्याकरितां हीं सूत्रें लिहिलेलीं आहेत. या सूत्रांची एकूण संख्या सत्यांयशी असून तीं चार पादांत विभागलेलीं आहेत. अन्तोदात्त, आद्युदात्त द्वितीयोदात्त आणि पर्यायोदात्त असे चार पादांचे क्रमानें विषय आहेत.

**कालः**– या सूत्रांचे आधार म्हणून उतारे पतञ्जलीनें आपल्या महाभाष्यांत घेतलेले आढळतात[1]. यावरून याचा काल ख्रि. पू. दुसऱ्या शतकाहून प्राचीन ठरतो. त्यानंतर काशिका, कैय्यट प्रक्रियाकौमुदीकार रामचंद्र, भट्टोजी दीक्षित, [2]नागेशभट्ट वगैरे मान्य ग्रंथकारांनीं या सूत्रांचा नामनिर्देश करून उल्लेख केला आहे. उतारे घेतले आहेत व स्पष्टीकरणहि केलेलें आहे. यावरून यांचा काल, महत्त्व व मान्यता लक्षांत येते.

**कर्ता**– या सूत्राच्या कर्त्याचें नांव शन्तनु असें आहे. हरदत्त व नागेशभट्ट यांनीं याचें नांव शन्तनु असल्याचेंच मान्य केलें आहे. शान्तनवाचार्यप्रणीत असें शेवटीं येतें. त्याचाहि अर्थ शन्तनु आचार्यप्रणीत असा नागोजीभट्टानें शेखरांत केला आहे. शान्तनवाचार्य प्रणीत या शब्दावरून कात्यायनाप्रमाणें जरूर नसतांना तद्धित प्रयोग करणारा हा दाक्षिणात्य असावा असा भैरवमिश्रानें आपल्या चन्द्रकला नांवाच्या टीकेंत अभिप्राय व्यक्त केला आहे.

**पाणिनिकृत नाहींतः**– हीं सूत्रें पाणिनिकृत असावींत असें म्हणणाऱ्या लोकांचा निर्देश नागोजीभट्टानें आपल्या लघुशब्देन्दुशेखरांत केला आहे. पण तें मत त्याला स्वतःला मान्य नाहीं. वृषादीनां च ( पा. सू. ६-१-२०३ ) व उञ्छादीनां च ( पा. सू. ६-१-१६० ) या दोन आकृतिगणानें अनुक्रमें आद्युदात्तत्व व अन्तोदात्तत्व सिद्ध असतां ग्रामादीनां च ( फि. सू. ३८ ) व घृतादीनां च ( फि. सू. २१ ) हीं सूत्रें स्वतंत्र त्याच कार्याकरितां करण्याची जरूरी नव्हती. तसेंच कर्मधारयवदुत्तरेषु ( पा. सू. ८-१-११ ) या सूत्रानें परस्य अन्तोदात्त सिद्ध असतां प्रकारादिद्विरुक्तौ ( फि. सू.

---

१ प्रातिपदिकस्य चान्त इति प्रकृतेरन्तोदात्तत्वं शास्ति + + यत्रानुदात्ता प्रकृतिः । समत्वम् । सिमत्वम् ( महाभाष्य ३·१·३· पान ९; ओळ १७; फिट्सूत्र ७८; शिवाय पाहा महाभाष्य ६·१·९१; १२३ व यावरील कैयटप्रदीप ).

२ परत्वात्प्रकृतिस्वर एव स्यादित्यर्थः । फिट्स्वरोऽपि बाध्य एवेति तैत्तिरीयेऽपि दोषः । यद्वा फिट्सूत्राणि पाणिन्यपेक्षया आधुनिककर्तृकाणि इति परत्वं बोध्यम्–इति नागेशभट्टकृत उद्योतः

८६ ) यानें पटपटु या ठिकाणीं परस्य अन्तोदात्त सांगितलेला आढळतो. त्यावरून हा पाणिनीहून भिन्न होता असें दिसतें.

**पाणिनिपूर्वः**– पाणिनि हा अव्युत्पत्ति–पक्षवादी असल्यानें त्याला 'सव धातुजं ' हा पक्ष मान्य नाहीं. अशा स्थितींत प्रत्येक शब्दप्रकृतीचे स्वर नमूद करणें पाणिनीला आवश्यक होते. पाणिनीनें प्रकृतिस्वर गृहीत धरलेले असून [1]कात्यायनानें त्यांचा उल्लेख केलेला आहे. तें काम पूर्वींच शन्तनूनें फिटसूत्राच्या रूपानें केलेलें असल्यानें पाणिनीनें तें काम केलें नसावें. असें असेल तर हीं सूत्रें पाणिनीपूर्वकालीन मानावयास पाहिजेत. सिद्धान्तकौमुदींतील वैदिक प्रकरणावर सुबोधिनी टीका लिहिणारानें हें मत नमूद केलें आहे ( ८६ ).

**परिभाषा नवीः**– यांनीं पारिभाषिक शब्द बरेच वापरलेले आहेत. त्यांत वृद्ध ( ४६ ), अच् ( ५१ ), लघु ( ४४ ), गुरु ( ४२ ) सारखे कांहीं शब्द पाणिनीचे वापरलेले असले तरी पुष्कळच शब्द अगदीं निराळे आणि नवे आढळतात. ते माहितीकरितां वर्णक्रमानें पुढें देत आहे.

अनुच्च = अनुदात्त ( ७८ )
अष् = अच् ( ह्यष् ४९, बह्वष् ४२ )
नप् = नपुंसक ( ६१ )
फिष् = प्रातिपादिक ( १ )
यमन्वन् = वृद्ध ( ४१ )
शिट् = सर्वनाम ( २८ )
स्फिग् = लुप् ( ३९ )
हय् = हल् ( ४८ )

या परिभाषेचा पाणिनीच्या ग्रंथांत निर्देश आढळत नाहीं. अष् ( अच् ) व हय् ( हल् ) या प्रत्याहारावरून याचीं अक्षरसमाम्नाय सांगणारीं सूत्रेंहि वेगळीं असावींत हें स्पष्ट होतें. या पारिभाषिक शब्दावरून हा पाणिनीहून वेगळ्या परंपरेंतील होता याबद्दल शंका राहत नाहीं. पाणिनीच्या सूत्रांनीं गतार्थ असणाऱ्या गोष्टीहि हा सांगतो त्यावरून याची परंपरा स्वतंत्र दिसते ( पहा. फि. सू. ७, ८६ ). हा पाणिनीच्या पूर्वींचा असावा आणि याचा पाणिनीनें अनुवाद केलेला असावा. ही गोष्ट जयकृष्ण मौनीनें केलेल्या वैदिक प्रकरणावरील सुबोधिनी व्याख्येंत नमूद आहे ( ८६ ).

**स्वर सर्वत्रः**–उदात्तादि स्वर वेदांत असतात, भाषेंत नसतात अशी आपली समजूत आहे. पण ही गोष्ट फिट् सूत्रकाराला मान्य नाहीं.तो वेदाप्रमाणें भाषेंतहि प्रत्येक शब्दाला

---

१ प्रकृतिस्वरे प्रत्ययस्वराभावः ( कात्यायनवार्तिक–महाभाष्य ६-१. १५८-७. पान ९९ ओळ १७ )

स्वर आहे असें मानतों. वेद आणि भाषा यांतील शब्दांचे स्वर सांगण्याचा त्याचा हेतु दिसतो. जेथें वेद व भाषा यांत सरळ भेदच आढळतो तेथेंच फक्त छन्दसि शब्द घालून वेदांतील फरक व्यक्त केला आहे. जर हें सर्वच प्रकरण वेदविषयक असतें तर छन्दसि असें अधिकारसूत्र करूनच सूत्रें रचिलीं असतीं. एकंदर सूत्रांत फक्त पांच ठिकाणीं छन्दसि पद घालून त्यांनीं भाषेहून फरक दाखविला आहे.[1] आणि फक्त एका ठिकाणीं अथर्ववेदांतील भेद व्यक्त केला आहे.[2] यावरून हीं सूत्रें लोकवेद साधारण असून सध्यां वेदोपयुक्त म्हणून भट्टोजीवगैरेंनीं वैदिक प्रकरणांत त्यांचा समावेश केला आहे.

**स्वरभेदानें अर्थभेदः–** अर्थभेदानें स्वरभेद असणारे कांहीं शब्द यांत मुद्दाम दिलेले आढळतात. उदाहरणार्थ अक्ष शब्द पाहा. त्याचे फासा आणि इतर कांहीं अर्थ आहेत. ३५ व्या सूत्रांत फासे अर्थ नसलेला अक्ष आदि उदात्त होतो असें सांगितलें आहे. आणि त्याचें तस्य नाक्षः असें उदाहरण दिलें आहे. फासे अशा अर्थाचा अक्ष शब्द अक्षैर्मा दीव्यः (ऋ. १०. ३४) या सुप्रसिद्ध द्यूतसूक्तांत आला आहे. तेथें तो आद्युदात्त नाहीं.

अङ्गुष्ठ शब्द भाषेंत मध्योदात्त पण वेदांत अन्तोदात्त होतो असें मुद्दाम सांगितलें आहे (१४)

अर्जुन शब्दाचा गवत असा अर्थ असतां स्वर वेगळा आणि वृक्ष वगैरे अर्थ असता स्वर वेगळा असें स्पष्ट नमूद आहे. गवत असा अर्थ असतां अर्जुन शब्द अन्तोदात्त असतो (१६) आणि वृक्ष वगैरे अर्थ असतां आद्युदात्त होतो.

कृष्ण शब्दाच्या स्वराबद्दल तर यापेक्षां अधिक चिकित्सा केलेली दिसते (११, १२). कृष्ण हा शब्द मृगवाचक नसेल तेव्हां तो अन्तोदात्त होतो. कृष्णानां व्रीहीणाम्; कृष्णो नोनाव वृषभः हीं त्याचीं उदाहरणें होत. कृष्णो रात्र्यै येथें तो मृगवाचक असल्यानें आद्युदात्त होतो. पण कृष्ण शब्द विशेषनाम असेल तर त्याला विकल्पानें अन्तोदात्त स्वर होतो. म्हणजे एकदां आद्युदात्तहि होतो. याचीं उदाहरणें अयं वां कृष्णो अश्विना व कृष्ण ऋषि अशीं देतात.

ज्येष्ठ शब्दाचे दोन अर्थ प्रसिद्ध आहेत. वयानें अधिक असणाऱ्या माणसाला ज्येष्ठ म्हणतात आणि पूज्य अशा अर्थानेंहि ज्येष्ठ शब्दाचा उपयोग करतात. वयोवाचक ज्येष्ठ वृद्ध शब्दापासून आणि केवळ पूज्यता दर्शविणारा ज्येष्ठ शब्द प्रशस्य शब्दापासून तयार होतो. त्यांच्या स्वरांत फरक आहे (२२). ही गोष्ट नमूद केलेली आढळते हें आश्चर्य आहे. वास्तविक मराठींत सुद्धां ज्येष्ठ बंधु आणि गांवांतील ज्येष्ठ अशा स्थळीं

---

टीप– १ १०, १४, ५८, ७३, ७७.

२ सिमस्याथर्वणेऽन्त उदात्तः ७९

आपण स्वर बदलतोच. पण बोलण्यांतील ही लकब आपण नमूद न करितां शिष्टांच्या अनुकरणानें परंपरेंत रक्षण करतो.

तशीच पृष्ठ शब्दाची स्थिति आहे. वेदांत हा शब्द अन्तोदात्त असतो आणि भाषेंत आद्युदात्त असतो हें नमूद केलेलें आढळतें (१५).

याशिवाय आणखी पुष्कळ शब्दांची चर्चा करतां येण्यासारखी आहे. वेदांतील उदाहरणें पाहून त्यांचे स्वर तपासतां येण्यासारखे आहेत व त्यावरून अनुमानें काढण्यासारखीं आहेत. पण तें रुक्ष आणि क्लिष्ट काम उद्बोधक असल्यानें पुढें एखाद्या प्रसंगीं करूं.

**व्याकरणाचीं अङ्गें:-** व्याकरण म्हटलें कीं त्यांत प्रक्रियेकरितां अष्टाध्यायी, धातूकरितां धातुपाठ, गणाकरितां गणपाठ, धातूपासून शब्द करण्याकरितां उणादि, उच्चाराकरितां शिक्षा, लिङ्गज्ञानाकरितां लिङ्गानुशासन; तसें शब्दांना उदात्तादि स्वर असतात तें सांगण्याकरितां हीं फिट्सूत्रें आहेत. वैदिक किंवा लौकिक, कोणतीहि भाषा असो तिला स्वर असतात असा सिद्धान्त आहे आणि त्याला अनुसरून हें पाणिनीचें व्याकरणशास्त्र आहे.

---

# १६ श्रीशिवराज-राज्याभिषेक-कल्पतरु

(श्री. य. ग. फफे मनोहर, पुणें)

*श्रीशिवराज-राज्याभिषेक-कल्पतरु या नांवाचा एक लहानसा संस्कृत पद्यात्मक ग्रंथ भा. इ. सं. मं. त्रैमासिक वर्ष १० अंक १ मध्यें प्रसिद्ध झालेला आहे. मागें शिवभारत, परमानंदकाव्यम् इत्यादि ग्रंथांवर मंडळांत चर्चा करण्यांत आली होती, त्या स्वरूपाची चर्चा या कल्पतरूसंबंधानें माझ्या मतें होऊं शकणार नाहीं. कारण ते ग्रंथ भाषाप्रौढीच्या दृष्टीनें व काव्यदृष्टीनेंहि उच्च प्रतीचे आहेत, तसा हा ग्रंथ नाहीं. केवळ वृत्तान्तकथनात्मक असा हा ग्रंथ आहे. शिवाय शिवभारतादि ग्रंथांच्या चर्चेच्या वेळीं छापील प्रतीशिवाय हस्तलिखित पोथी किंवा पोथीच्या पानांचे फोटो उपलब्ध असल्यानें पाठभेदादि चर्चेंत त्यांचें बहुमोल साहाय्य झालें होतें. तसें प्रस्तुत ग्रंथास उपलब्ध नाहीं. त्रैमासिकांत छापलेली एक प्रत तेवढीच आपणापाशीं आहे. म्हणून पाठभेदादिचर्चेंत न शिरतां केवळ ग्रंथांतील विषयापुरतीच मर्यादित चर्चा करावी लागणार आहे, हें प्रथमच स्पष्ट करणें अवश्य वाटतें.

प्रस्तुत कल्पतरूची एकमेव हस्तलिखित पोथी उपलब्ध आहे. ती कलकत्ता येथील

---

* मंडळ वाढदिवस ४५, श. १८७७, दि. २१-६-५५

बंगाल एशियाटिक–सोसैटीच्या ग्रंथालयांत आहे. तिची प्रत कै. का. ना. दीक्षित यांनीं मिळवून कै. द. वि. आपटे यांच्या सहकार्यानें भा. इ. सं. मं. त्रैमासिकांत प्रसिद्ध केली आहे. या पोथीची माहिती संपादकांनीं पुढीलप्रमाणें दिली आहे:—"या पोथीचीं तेरा पानें आहेत. त्यांतील पहिलीं सात एका हस्ताक्षरांत व पुढील सहा दुसऱ्या हस्ताक्षरांत आहेत. अनेक पानांच्या समासांवर अधिक श्लोक लिहिलेले आहेत, ते तिसऱ्याच हस्ताक्षरांत आहेत. तथापि हीं तिन्ही हस्ताक्षरें शिवकालीनच आहेत. या कल्पतरूच्या आठ शाखा आहेत. त्यांमिळून एकंदर श्लोक २३६॥ आहेत. पोथींत गोविंद उवाच, निश्चलउवाच इ० वाक्यें, कांहीं महत्त्वाचे शब्द आणि शाखासमाप्तिदर्शक संकल्प तांबड्या शाईनें लिहिलेले आहेत. ग्रंथाच्या नांवावरून हा ग्रंथ गागाभट्टकृत–शिव-राज–राज्याभिषेक–वर्णनपर असेल असें वाटण्याचा संभव आहे. पण हा समज चुकीचा आहे. गागाभट्टकृत राज्याभिषेकांतील कांहीं दोष दाखवून ललितापंचमीस निश्चलपुरीनें तांत्रिकविधीनें केलेल्या दुसऱ्या राज्याभिषेकाचें वर्णन करणारा हा ग्रंथ आहे" इतकी त्रोटक माहिती संपादकांनीं उपोद्घातांत दिली आहे. आणि ग्रंथांतील इतर माहितीचें विवेचन सवडीनुसार इतरत्र करण्यांत येईल असें आश्वासन दिलेलें आहे. पण त्याप्रमाणें त्यांचें विवेचन प्रसिद्ध झालेलें नाहीं.

आतां या कल्पतरूच्या आठ शाखांत कोणता विषय आला आहे तें संक्षेपानें प्रथम पाहूं.

निश्चलपुरी नामक योगी रायगडास राज्याभिषेकाचे वेळीं उपस्थित होता. तो राज्याभिषेकसमारंभानंतर कोकणांतील तीर्थक्षेत्रें पहात दाभोळ, पंचनद, परशुराम, संगमेश्वर, निर्वैरकाजवळील (पुळ्याचा) गणपति, धूतपापेश्वर, राजापूरची गंगा, सप्तकोटीश्वर व पंचगंगा यांवरून कुडाळेश्वरास आला. तेथें गोविंद नामक विद्वान् ब्राह्मणाची व त्याची गांठ पडली. या दोघांचा पूर्वीं काशीस परिचय झालेला असल्यानें गोविंदद्विजानें निश्चलपुरीस प्रश्न केला. 'योगिराज, तुम्ही इकडे कोणीकडे?' इतका विषय प्रथम शाखेंत आला आहे.

निश्चलपुरी म्हणाला, शिवराज हा साक्षात् शिवाचा पूर्णावतार आहे. त्याजपाशीं मी असतों. तो छत्रपति आहे म्हणजे त्यास राज्याभिषेक झाला आहे. यावर राज्याभिषेक-समारंभ कसकसा झाला तें गोविंदानें विचारल्यावरून निश्चलपुरीनें सांगितलें. तो म्हणाला गागाभट्ट नाशकास आला होता त्यास बोलावून शिवरायानें राज्याभिषेक करण्याचें योजिलें. पण गागाभट्टाच्या आगमनापासूनच अनिष्ट गोष्टी व उत्पात घडण्यास प्रारंभ झाला. राजपत्नी काशी निवर्तली. लहानशा चकमकींत सेनापति प्रतापराव मारला गेला. शिवरायास गायत्र्युपदेश झाला त्याच्या आदल्या दिवशीं उल्कावृष्टि होऊं लागली. पण निश्चलपुरी म्हणतो, मी हनुमन्मंत्राच्या योगें तिचें निवारण केलें. गायत्र्युपदेश कुमुहूर्तावर झाला. येथें द्वितीय शाखा समाप्त झाली.

शिवाजीचीं पूर्वीच्याच स्त्रियांशीं पुन्हां लग्नें लावण्यांत आलीं. शिवाजीनें सुवर्णतुला करून मोठा दानधर्म केला. गागाभट्टानें आपल्याच वशिल्याच्या ब्राह्मणांची वर्णी लाविली. निश्चलपुरीनें पाठविलेल्या ब्राह्मणांचा अव्हेर केला व निश्चलपुरी नमस्कारार्ह नाहीं असें शिवाजीस सांगितलें. सुवर्णतुलेनंतर मोठा अपघात होऊन गागाभट्टाच्या नाकास लाकूड लागलें आणि बाळंभट्ट गुरुजींच्या मस्तकावर स्तंभावरील लाकडी कमळ पडलें. मग शिवरायास अभिषेक झाला. इतका विषय तृतीय शाखेंत आला आहे.

कुमुहूर्तावर अभिषेक केल्यामुळें आणि स्थानिक देवांचें पूजन व त्यांस बलिदान न केल्यामुळें कशीं विघ्नें उपस्थित झालीं व कशा अनिष्ट गोष्टी घडल्या तें चौथ्या शाखेंत वर्णिलें आहे.

झालेल्या विधींत कसे दोष घडले आहेत व त्यांमुळें पुढेंहि कशा अनिष्ट गोष्टी घडणार आहेत हें निश्चलपुरीनें शिवाजीस सांगितलें. त्याप्रमाणें तेराव्या दिवशीं राजमाता निवर्तली. व प्रतापगडावरील पागा जळली. मग शिवाजीच्या विनंतीवरून निश्चलपुरीनें तांत्रिकविधीनें पुन्हां राज्याभिषेक करण्याचें मान्य केलें व जपास ब्राह्मण बसविले आणि पंधराव्या दिवशीं शत्रु हस्तगत होईल म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें प्रत्यय आला व तुकोराम हस्तगत झाला. निश्चलपुरीकडून नुसता अभिषेक करून घ्यावा पण मंत्रोपदेश घेऊं नये असें मत मंत्र्यांनीं दिलें, पण तें शिवाजीनें तिरस्कारलें. येथें पांचवी शाखा समाप्त झाली.

ललितापंचमीस अभिषेकमहोत्सव झाला. सिंहासनाचे सिंह, तें सिंहासन, महाद्वार इत्यादिकांस व अनेक देवतांस बलिदानें केलीं. हा विषय सहाव्या शाखेंत आला आहे.

निराळ्या रौप्यआसनावर अभिषेक केल्याचें आणि शिवरायांनीं त्र्यक्षररूप सिद्ध मंत्र घेतल्याचें वर्णन सातव्या शाखेंत आहे. आणि आठव्या शाखेंत राजसभा-वर्णन व भविष्यकथन आहे.

सारांश, पहिल्या शाखेंत निश्चलपुरीचें तीर्थाटन, त्यापुढील ३ शाखांत गागाभट्ट-कृत राज्याभिषेकाचें व त्यांतील दोषांचें वर्णन, त्यापुढील तीन शाखांत या दोषांच्या परिणामाचें व निश्चलपुरीकृत तांत्रिक विधीच्या राज्याभिषेकाचें वर्णन आणि शेवटल्या शाखेंत राजसभावर्णन व भविष्यकथन आहे. म्हणजे दोन्ही राज्याभिषेकांचें थोडक्यांत वर्णन या ग्रंथांत आलें आहे असें दिसून येईल.

कल्पतरूच्या पोथींत समासावर लिहिलेले श्लोक ४३ असून मूळचे श्लोक १९३॥ आहेत. म्हणजे मागाहून कोणीतरी घातलेली भर मूळच्या $\frac{1}{4}$ पेक्षां अधिक आहे. प्रक्षेपांनीं ग्रंथविस्तार कसा होत जातो याचें हें उदाहरणच होय. ही भर म्हणजे मूळांत जें

थोडक्यांत सांगितलें होतें त्याचाच विस्तार आहे. उदा०–मूळांत 'यवनान् धर्मनाशनान्' असे शब्द आहेत. येथें यवन हिंदूधर्मांचा नाश कसकसा करीत होते तें विस्तारानें समासावर लिहिलें आहे. न कृतं बलिदानं न द्वारपालप्रपूजनम् असे गागाभट्टकृत विधींतले दोष मूळांत सांगितले आहेत. येथें समासावर घातलेल्या भरींत कोणकोणत्या देवतांचें पूजन व बलिदान करावयाचें राहिलें त्यांची मोठी यादीच दिली आहे. क्वचित् समासावर घातलेली भर अप्रयोजकहि आहे. निश्चलपुरीनें शिवाजीला त्र्यक्षरमंत्राचा उपदेश केला तेथें त्या मंत्राला मूळांत विद्या असें म्हटलें असून तिला लोकविश्रुता, त्रैलोक्यवशकारिणी इ० विशेषणें योजिलीं आहेत. या विशेषणांवरून जणूं काय हें एकाद्या देवीच्या मूर्तीचेंच वर्णन चाललें आहे असा प्रक्षेपकास भ्रम होऊन त्यानें समासावर लसत्सीमंतसिंदूरां भ्रमन्नयनपंकजां। चंचत्कपोलफलकां चलत्श्रवणकुंडलां इत्यादि सात श्लोक लिहिले आहेत!

याचप्रमाणें पोथींत कांहीं ठिकाणीं व्यर्थ खोडलेलें आहे असें आढळतें. उदा०– पृ. ३६ ओळ ४ वरील तद्वाक्यमकरोत् तिरः हा चरण चुकीनें खोडला आहे. कारण तद्वाक्यम् म्हणजे मंत्र्यांनीं दिलेला, मंत्रोपदेश घेऊं नये हा सल्ला तिरस्कारून शिवाजीनें मंत्रग्रहण केल्याचें वर्णन पुढें आलें आहे. शाखासमाप्तिदर्शक चार संकल्पांतील कवीच्या उल्लेखाच्या ओळी खोडल्या आहेत. त्यांसंबंधीं विवेचन पुढें करण्यांत येणारच आहे.

प्रस्तुत कल्पतरूनें कळणारी नवीन ऐतिहासिक माहिती अशी:—

१ शिवाजीची स्त्री ता १८।३।१६७४ रोजीं वारल्याचें शकावलींत आहे पण तेथें त्या स्त्रीचें नांव दिलेलें नाहीं. तें काशी असें होतें हें या कल्पतरूवरून कळतें.

२ शिवाजीचा विवाह ३०।५।१६७४ रोजीं झाल्याचें शकावलीवरून कळतें, पण हा विवाह नूतन स्त्रीशीं झाला नसून पूर्वींच्याच स्त्रियांशीं विधिपूर्वक विवाह या दिवशीं झाले असें या कल्पतरूवरून कळतें. कल्पतरूंतील ही माहिती जमेस न धरल्यामुळेंच डॉ. बाळकृष्ण यांनीं शिवाजीच्या स्त्रियांची संख्या आठाऐवजीं नऊ सांगितली आहे. (शिवाजी दि ग्रेट भाग २ पृ. ५६३).

३ गागाभट्टानें केलेला राज्याभिषेक वेदोक्त कीं पुराणोक्त याविषयीं वाद असल्याचें बखरींवरून दिसतें. तो वैदिक विधीनें झाला असा स्पष्ट निर्देश कल्पतरूंत आहे.

४ गागाभट्टास पैठणाहून बोलावून आणलें असें चिटणीस बखरींत म्हटलें आहे. तो स्वतःच शिवाजीच्या भेटीस रायगडास आला होता असें सभासद व चित्रगुप्त म्हणतात. तो नाशकास आला होता, तेथून शिवाजीनें त्यास बोलावून आणलें असें प्रस्तुत कल्पतरु म्हणतो. गागाभट्ट १६६४ त राजापूर येथील विद्वत्परिषदेस उपस्थित होता त्यावेळींहि शिवाजीची व त्याची भेट झाली असल्याचा संभव आहे. निदान परस्परांस परस्परांची माहिती खास होती. तेव्हां गागाभट्ट हा शिवाजीचे भेटीस येत

असावा व तो नाशिकापर्यंत आल्याचें कळतांच शिवाजीनें त्यास आणावयास कोणी ब्राह्मण सामोरे पाठविले असावे हेंच अधिक संभवनीय वाटतें.

५ तुकोराम हा शिवाजीचा शत्रु हस्तगत झाला असा उल्लेख आला आहे. असा शत्रु म्हणून उल्लेख केला जाण्यास तो निदान शत्रुपक्षाकडील मातबर सरदार तरी असावयास हवा. तुकोराम म्हणून शिवाजीचा एक सुभेदार कोंकणांत होता तो येथें घेतां येत नाहीं. तेव्हां शत्रु म्हणून उल्लेखिलेल्या या तुकोरामाचा शोध इतिहासज्ञांनीं लावावा अशी सूचना करणें प्राप्त आहे.

६ शिवाजीनें ज्याचा जीर्णोद्धार केला तें सप्तकोटीश्वराचें देवालय कोठें आहे याविषयींहि मला कांहीं माहिती नाहीं इतिहासज्ञान्यांनीं ही माहिती द्यावी; अशी विनंती आहे.

आतां कांहीं विवेचनीय प्रश्न उत्पन्न होतात त्यांविषयीं चर्चा करावयाची—

पहिला प्रश्न असा मनांत येतो कीं, शिवाजीनें तीनचार महिन्यांच्या अंतरानें दोनदां राज्याभिषेक खरोखरच करून घेतला कीं काय? दोनदां राज्याभिषेक करून घेणें ही कल्पना चमत्कारिक वाटते यांत शंका नाहीं. शिवाजी आणि गागाभट्ट या आपल्या निबंधांत म. म. काणे यांनीं असें मत दिलें आहे कीं, निश्चलपुरीनें केलेला विधि हा राज्याभिषेक नसून ती एकादी शांति केलेली असावी. अनिष्ट, अशुभ गोष्टी घडल्यास शांति करण्याची पद्धतिच आहे. तशीच एकादी शांति निश्चलपुरीच्या नेतृत्वाखालीं करण्यांत आली असावी. महामहोपाध्यायांचें हें अनुमान मान्य करावयाचें तर प्रस्तुत ग्रंथ ही केवळ कल्पितकथाच म्हणावी लागेल. राज्याभिषेक-कल्पतरु हें ग्रंथनाम निराधार होईल आणि त्यांत तांत्रिकरीत्या केलेल्या सिंहासनारोहणाचें व राज्याभिषेकाचें जें सविस्तर वर्णन आहे तें सारें काल्पनिक म्हणावें लागेल. शिवाय तसें म्हणण्यास एक मोठी अडचण आहे. ती म्हणजे निधनशकावलींत ललितापंचमीस पुन्हां सिंहासनारोहण अशी नोंद केलेली आढळते ही होय. ही शकावली शिवापूरकर देशपांड्यांकडील आहे. तींतील ही नोंद कलकत्ता येथील या पोथीच्या आधारें केली असणें संभवनीय वाटत नाहीं. ही पोथी आणि निधनशकावली हे दोन स्वतंत्र पुरावे आहेत. दोहोंतहि ललितापंचमी ही समान मिति आहे. व दोहोंतहि पुन्हां सिंहासनारोहण केल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. तेव्हां परस्पर-निरपेक्ष अशा या दोन पुराव्यांवरून पुन्हां राज्याभिषेक-विधि झाला असें म्हणणें प्राप्त होतें.

येथें हें ध्यानीं ठेविलें पाहिजे कीं शिवाजीनें केलेले हे दोन्ही विधि राज्याभिषेकाचेच होते. त्यांतील एक मंचकारोहण व दुसरा राज्याभिषेक असा त्यांत भेद नव्हता. एका राजानंतर दुसरा राजा गादीवर येतो तेव्हां तो कारभार हातीं घेतांना प्रथम तात्पुरता समारंभ करितो, त्यास मंचकारोहण म्हणतात. पुढें सर्व सिद्धता करून सुमुहूर्तावर मोठ्या प्रमाणावर जो विधिपूर्वक समारंभ होतो त्यास राज्याभिषेक म्हणतात.

संभाजीनें असे दोन समारंभ केल्याचें इतिहासज्ञांस माहीत आहेच. त्यानें राज्यकारभार हातीं घेतांच जुलै १६८० मध्यें जो समारंभ केला तें मंचकारोहण होय. सर यदुनाथ सरकार यांनीं यास The Coronation of Shambhaji at Raigarh in July 1680 असें परमानंदकाव्याचा पुरस्कार पृ. १ वर म्हटलें आहे तें चिन्त्य होय. संभाजीचा राज्याभिषेक म्हणजे कारोनेशन पुढें सुमारें सहा महिन्यांनीं सन १६८१ त (शके १६०२ रौद्र माघ शुा ७ रविवार–झालेलें आहे. जेधेश० व परमानंदका० पृ. ९ श्लो. ६३) शिवाजी महाराजांनीं स्वतःच राज्य संपादिलें होतें म्हणून त्यांस मंचकारोहण –समारंभ करण्याचें प्रयोजनच नव्हतें. सन १६७२ त किंवा तत्पूर्वींहि ते सिंहासनाधीश होतेच. त्यांच्या सिंहासनासाठीं १६०० हून अधिक रुपये किमतीचें किनखाप इ० कापड १६७२ त खर्ची पडलेलें आढळतें. अर्थात् शिवाजी आधींपासून सिंहासनाधीश होताच. राज्याभिषेकविधि मात्र १६७४ त झाला इतकेंच.

एकदां राज्याभिषेक केल्यानंतर शिवाजीस पुन्हां राज्याभिषेक–समारंभ करण्यास काय कारण घडलें असेल हा यापुढील प्रश्न होय. यासंबंधानें सर यदुनाथ असें म्हणतातः— The first success of the new cult was gained when The Tantric high priest Nischalputi by creating demonic disturbances indused Shivaji to hold a second coronation of himself (परमानंदकाव्यम् याचा पुरस्कार पृ. ५ क. ३ पहा.) निश्चलपुरीनें (आपल्या योगसामर्थ्यानें) आसुरी उत्पात उत्पन्न केले व तेणेंकरून शिवाजीस पुनः राज्याभिषेक करून घेणें भाग पाडलें असें सर यदुनाथ सरकार येथें स्पष्ट म्हणत आहेत! मंत्रतंत्राच्या सामर्थ्यानें आसुरी उत्पात उत्पन्न करितां येतात असें भाविकांनीं म्हणावें. पण त्यास इतिहास म्हणतां येणार नाहीं असें मला वाटतें. शिवाय निश्चलपुरीनें उत्पात उत्पन्न केले यास आधार काय? असें या कल्पतरु ग्रंथांत तरी कोठेंहि म्हटलेलें नाहीं. उलट गागाभट्टानें केलेल्या अविधीमुळें उत्पात झाले असें म्हटलें आहे आणि निश्चलपुरीनें मंत्रसामर्थ्यानें ते निवारिले असें अगदीं उलट त्या ग्रंथांत वर्णिलेलें आहे. खरा प्रकार असा दिसतो कीं ज्येष्ठ शुा १३ स वैदिकपद्धतीनें राज्याभिषेक झाल्यानंतर लवकरच म्हणजे ज्येष्ठ वाा ९ स राजमाता जिजाबाई निवर्तली. तसेंच उल्कापात वगैरे कांहीं उत्पातहि तेव्हां घडलें असतील. कालानुरोधानें घडलेल्या या अनिष्ट गोष्टींचा संबंध सामान्य जनांनीं वैदिक पद्धतीनें केलेल्या राज्याभिषेकाशीं जोडला असणें अगदीं साहजिक आहे. अनेक विवाह व संतति झाल्यानंतर ४४ व्या वर्षीं मुंज करणें आणि पूर्वींच्या विवाहित स्त्रियांशींच पुन्हा लग्नें लावणें यासारख्या गोष्टी सामान्य जनांस सहज पचण्या-जोग्या नव्हत. या कृत्यांनीं त्या गतानुगतिक लोकांचे मनांत मोठा विकल्प उत्पन्न झाला असणें अगदीं साहजिक आहे. हा विकल्प कोणत्यातरी उपायानें दूर करणें अवश्य होय हें महाधोरणी शिवाजीनें ध्यानीं घेऊन दुसऱ्या राज्याभिषेकाची युक्ति

योजिली असावी. लोकानुरंजनासाठीं चतुर राज्यकर्त्यांस अशा कांहीं गोष्टी कराव्या लागतात. पहिल्या वैदिक राज्याभिषेकांत पशुबलिदान मुळींच झालें नव्हतें. तत्कालीन सामान्य जनसमजुतीप्रमाणें तें तर अवश्यच होतें. म्हणून पुनः अभिषेक करवून व त्यांत भरपूर पशुबलिदान करून शिवाजीनें सामान्य जनांचे मनांतील विकल्प दूर केला असावा असें मला वाटतें.

'राज्याभिषेक-कल्पतरु' या ग्रंथाचा कर्ता कोण हा यापुढील प्रश्न होय. सर यदुनाथ सरकार यांनीं हा ग्रंथ निश्चलपुरीनें रचला असें म्हटलें आहे. परमानंदकाव्यम् याचा पुरस्कार पृ. ४ ओळी १२, १३ पहा. Sanskrit poem the Sivaraja Rajyabhisheka–Kalpataru or description of Shivaji's second Coronation written by Nischalpuri the Tantric priest. इ०. सर यदुनाथ यांनीं हें कसें लिहिलें कांहीं समजत नाहीं. या कल्पतरु-ग्रंथांत तरी तो निश्चलपुरीनें लिहिला असें म्हणण्यास कांहीं आधार नाहीं. तांत्रिक पद्धतीनें राज्याभिषेक-विधि करणें निराळें आणि ग्रंथ लिहिणें निराळें. अभिषेक निश्चलपुरीनें केला पण ग्रंथ-रचना कांहीं त्यानें केलेली नाहीं. म. म. काणे यांनीं शिवाजी व गागाभट्ट या निबंधांत म्हटलें आहे कीं गोविंद याच्या मुखकमलांत वास करणारा अनिरुद्धसरस्वती हा या ग्रंथाचा कर्ता आहे. नृसिंहसरस्वतीप्रमाणें अनिरुद्धसरस्वती नामक कोणी पुरुष असावा अशी भ्रांति येथें झालेली दिसते. कल्पतरूच्या आठ शाखांच्या अंतीं शाखासमाप्तिदर्शक जे संकल्प आहेत त्यांपैकीं चारांमध्यें "इति श्रीमद् बर्वोपनामक नारायणभट्टसूरिसूनु गोविंदमुखपद्मवासिन्यनिरुद्धसरस्वतीकृतौ" असा उल्लेख आहे. यांतील अनिरुद्ध-सरस्वती हा शब्द पुल्लिंगी मानला गेला असें दिसतें. पण तो स्त्रीलिंगी आहे. त्याचे मागें मुखपद्मवासी असें पुल्लिंगी विशेषण नसून मुखपद्मवासिनी असें स्त्रीलिंगी विशेषण आहे यावरून हें स्पष्ट आहे. येथें सरस्वती म्हणजे वाणी. अनिरुद्ध-सरस्वती म्हणजे अकुंठित अस्खलित वाणी. ही वाणी गोविंदद्विजाच्या मुखपद्मांत वसणारी. अर्थात् बर्वे कुलोत्पन्न नारायणसुत गोविंद हा या कल्पतरूचा कर्ता असें प्रस्तुत चार उल्लेखांवरून दिसून येतें.

तथापि याविषयीं क्वचित् कोणास संशय वाटेल असें कारण येथें घडलेलें आहे. तें म्हणजे या ग्रंथांतील कविनामाचा उल्लेख करणाऱ्या या चारी ठिकाणच्या ओळींवर पोथींत काळी रेघ ओढून त्या खोडल्या आहेत असें संपादकांनीं टीपेंत सांगितलें आहे. पोथींत तांबड्या शाईनें लिहिलेल्या या चार ठिकाणांच्या ओळी कोणी खोडल्या हें समजण्यास मार्ग नाहीं. पण या खोडणारास ग्रंथकार गोविंद बर्वे हा नसून दुसरा अमुक ग्रंथकार आहे असें निश्चित माहीत असतें तर त्यानें येथें तें दुसरें नांव अवश्य

लिहिलें असतें. तसें त्यानें लिहिलें नाहीं त्यापक्षीं दुसरा अमका ग्रंथकार असें त्यास कांहीं माहीत नव्हतें हें उघड आहे. तथापि या खाडाखोडीमुळें संशयास जागा राहते म्हणून खोडलेल्या या चार ओळी वगळून ग्रंथकार कोण याचा निश्चय अन्य प्रकारें होतो काय तें पाहूं.

ग्रंथाच्या उपसंहारांतील एक श्लोक खोडलेला नाहीं, तो पुढीलप्रमाणें आहे.

इति योगींद्रगोविंदसंवादेनानुवर्णितं । अनिरुद्धसरस्वत्या शिवराजाभिषेचनम् ॥

या श्लोकावरून 'राज्याभिषेक-कल्पतरु' अनिरुद्ध सरस्वतीनें म्हणजे अकुंठित वाणीनें रचला असें होतें. ही अकुंठित वाणी कोणाची हा प्रश्न उरतो. त्याचें उत्तर उपक्रमांतील एका श्लोकावरून मिळतें. तो श्लोक असाः—

कथं छत्रपतिः सोभूत् इति मे वद पृच्छतः ।
वाग्वादिनी वक्तुकामा छत्रधारणवर्णनम् ॥

गोविंद ब्राह्मण निश्चलपुरीस म्हणतो–शिवाजीचा राज्याभिषेक–समारंभ कसा कसा झाला तें मला सांगा. त्या समारंभाचें पद्यात्मक वर्णन करावें असें माझी वादिनी वाक् म्हणजे बोलकी वाणी इच्छीत आहे. गोविंदद्विजाची हि वादिनी वाक् म्हणजेच उपसंहाराच्या श्लोकांतील अनिरुद्ध–सरस्वती होय. अर्थात् उपक्रमोपसंहारांतील ह्या उल्लेखांवरून या शिवराजराज्याभिषेककल्पतरूचा कर्ता बर्वे कुलोत्पन्न नारायणसूनु गोविंद होच हें निर्विवाद ठरतें.

आतां निश्चलपुरीनें केलेल्या राज्याभिषेकाशीं शाक्तपंथाचा कांहीं संबंध होता काय तें पहावयाचें. शिवाजीनें तांत्रिकपद्धतीनें पुन्हां राज्याभिषेक करून घेतला यांत शाक्तपंथाचा महाराष्ट्रांतील पहिला विजय झाला व पुढें लवकरच संभाजीच्या वेळीं त्या पंथाचा महाराष्ट्रांत फार प्रसार झाला असें सर यदुनाथ यांनीं प्रतिपादिलें आहे. आणि उदाहरणार्थ म्हटलें आहे कीं, Paramananda was a Bhagawat or worshipper of Vishnu; His grandson (Govind) was a Tantric priest an adorer of Shiva's female half called Sakti or Kali. (प० का० पुरस्कार पृ. ३) महाराष्ट्रांतील शाक्तपंथाच्या प्रसाराचा हा पुरावा म्हणून दिलेला आहे. पण तो सत्य नाहीं. कारण परमानंदाचा नातु गोविंद हा शाक्तपंथी होता असें म्हणण्यास लवमात्र आधार नाहीं. परमानंदाप्रमाणेंच त्याचा नातु गोविंदहि भागवतच होता. परमानंदकाव्यम् या ग्रंथांत पृ. १०३ ते १८३ वर या गोविंदकवीचें जें काव्य समाविष्ट करण्यांत आलें आहे त्याचे प्रारंभीं "श्री

गोविंदो विजयतेतराम् " असें त्यानें लिहिलें आहे. त्यानें शाहूराजकीर्तिप्रभामंजरी या मराठी काव्याचे प्रारंभींहि " श्रीगोविंद प्रसन्न " असे शब्द लिहिले आहेत आणि या गोविंदानें नारायण दीक्षित बापट यांस लिहिलेलें २३।३।१७८२ चें पत्र पे. द. ४३-१६ मध्यें छापलें आहे. त्यांत तो लिहितो, "आमचा वृद्धापकाल झाला. पोटीं संतान नाहीं. बहुत जीर्ण झालों. यास्तव चतुर्थाश्रम संपादून माहुलीसंगमीं जलसमाधिस्थ होणार. जवळ रामचंद्राच्या मूर्ति आहेत त्या आपण सांभाळाव्या. नेवासें येथें आमचें वर्षासन तीनशें रुपये आहे, तें आपण घेऊन रामनवमीचा उत्सव चालवावा." सारांश, परमानंदाचा नातू गोविंद कवि हा रामोपासक-भागवतधर्मी होता; शाक्त-पंथी नव्हता.

स्वतः निश्चलपुरीदेखील योगीन्द्र व तंत्रविद्यापारंगत असला तरी तो शाक्तपंथी होता असें दिसत नाहीं. त्यानें कोंकणांतील परशुराम, संगमेश्वर, पुळ्याचा गणपति, राजापूरची गंगा, सप्तकोटीश्वर इ० तीर्थक्षेत्रांची यात्रा भाविकपणें केल्याचें वर्णन कल्पतरूच्या प्रथम शाखेंत केलें आहे. त्यावरून तोहि इतर सर्वसामान्य भारतीयांप्रमाणें सर्वदेवनमस्कारः केशवं प्रतिगच्छति अशा मताचा होता असें दिसतें. कवीनें त्यास अद्वैतानंदपूर्णार्थः असें म्हटलें आहे.

निश्चलपुरीनें शिवाजीस तांत्रिकविधीनें राज्याभिषेक केला असें म्हटलें असलें तरी या कल्पतरु ग्रंथांत त्या विधीचें जें वर्णन केलें आहे त्यांत कालीमातेचा किंवा शाक्तपंथाचा संबंध लवमात्रहि आलेला आढळत नाहीं. जप, मंत्रग्रहण, अभिषेक व निरनिराळ्या देवतांस बलिदान एवढाच विधि वर्णिला आहे. कालीचें पूजन, तिला उद्देशून हवन किंवा बलिदान यांचा लवलेशहि या विधींत आढळत नाहीं. तांत्रिकविधि म्हणजे पुराणोक्त विधि असेंहि असूं शकेल. शिवाजी म्हणतो, वैदिकं कर्म संपाद्य कर्तव्यमथ तांत्रिकं । संपादितं वैदिकं तु तांत्रिके वर्तते स्पृहा ॥ इत्यादि वचनांवरून वेदोक्त-पुराणोक्त हीच जोडी वैदिक-तांत्रिक या शब्दांनीं येथें दर्शविली जाते असें वाटतें.

आतां हा ग्रंथ केव्हां रचला गेला तें पाहूं. ग्रंथरचनेचा काल कवीनें दिलेला नाहीं तथापि आठव्या शाखेंतील पुढील श्लोकावरून तो अनुमानितां येतो. " एनस्यातिरथः पुत्रो राजारामेति यं विदुः । उत्साद्य यवनान् सर्वान् सार्वभौमो भविष्यति ॥ " शिवाजीचा पुत्र राजाराम सर्व यवनांचा उच्छेद करून सार्वभौम होईल असें भविष्य या कल्पतरूंत वर्तविलें आहे. हीं भविष्यें प्रायः ' पहायचें आणि सांगायचें ' अशा स्वरूपाचीं असतात. म्हणून राजाराम कर्नाटकांतून परत आल्यानंतर पण त्याच्या

मृत्यूपूर्वी हा ग्रंथ रचला गेला असें म्हणावयास प्रत्यवाय दिसत नाहीं. पोथींतील हस्ताक्षरें शिवकालीन आहेत असें संपादकांनीं म्हटलें आहे त्याचा अर्थ तीं शिवाजीच्या ह्यातींतील आहेत असा समजावयाचा नाहीं; तीं शिवकालासन्निधचीं आहेत असा जरासा व्यापक अर्थ समजावयाचा.

शिवाजी विद्यमान असतां झालेल्या शिवभारतादि ग्रंथांत शिवाजी हा विष्णूचा अवतार असें वर्णन आढळतें. उत्तरकालीन बखरींतुन तो शिवाचा अवतार सांगितलेला आहे. प्रस्तुत कल्पतरूमध्येंहि तो शिवाचा अवतार सांगितला आहे. हा उल्लेख कालदृष्ट्या प्रथमचा दिसतो. याचेंच अनुकरण यापुढील बखरकारांनीं केलें असावें.

येथवर शिवराज–राज्याभिषेक–कल्पतरु या ग्रंथास अनुसरून कित्येक प्रश्नांची चर्चा केली. या ग्रंथांत प्रथमा, द्वितीया, तृतीया यांप्रमाणें 'चतुर्था षष्ठा, सप्तमा' अशी आकारान्त स्त्रीलिंगी शब्दांची योजना, 'तसेंच स क्षणेनावनीं सर्वा **जयते सागरांबराम्**' यांसारखे कांहीं अशुद्ध प्रयोग आढळतात; तथापि भाषा प्रायः शुद्ध आहे. ती सरळ, सोपी व केवळ वर्णनात्मक असून हा ग्रंथ काव्यदृष्ट्या अगदीं सामान्य प्रतीचा असल्यामुळें त्या दृष्टीनें चर्चा करण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं. म्हणून ही चर्चा येथेंच पुरी करितों.

---

# भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणें.

## — मंडळ–प्रकाशन–सूची —

### स्वीय ग्रंथमाला

१ अहवाल ( शक १८३२ ) रु. ३
२ ,, ( शक १८३३ ) ५
३ सुबंतविचार (वि.का.राजवाडे)संपलें १०
४ वार्षिक इतिवृत्त ( शक १८३४ ) ५
५ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १२ ( वि. का. राजवाडे ) १।८
६ प्रथम संमेलनवृत्त (शक १८३५) ।१२
७ वार्षिक इतिवृत्त ( शक १८३५ ) ६
८ द्वितीय संमेलनवृत्त (शक १८३६) ३
९ वार्षिक इतिवृत्त ( शक १८३६ ) ३
१० मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड २० ( शिवकालीन घराणीं ) ३
११ वार्षिक इतिवृत्त ( शक १८३७ ) ६
१२ तृतीय संमेलनवृत्त ( शक १८३७ ) ३
१३ मुकुंद-महाभाष्य ( संस्कृत ) ।८
१४ ग्रंथराज ( दासोपंत ) ।८
१५ स्फुट प्रकरणें, भाग १ ला ।१२
१६ स्फुट प्रकरणें, भाग २ रा ।१२
१७ वार्षिक इतिवृत्त ( शक १८३८ ) ३
१८ चतुर्थ-संमेलनवृत्त ( शक १८३८ ) ४
१९ राजवाडे-खंड स्थलसूची ४
२० पंचम संमेलन-वृत्त ( शक १८३९ ) ३
२१ संशोधनसंग्रह ( छापत आहे )
२२ चंद्रचूड-दप्तर, कलम १ (द. वि. आपटे) ३
२३ महाराष्ट्र–सारस्वत, आ. १ ली ( वि. ल. भावे ) संपली १०
२४ षष्ठ संमेलन-वृत्त ( शक १८४० ) ४
२५ सप्तम संमेलन-वृत्त ( शक १८४१ ) ३
२६ संशोधकाची छोटी जंत्री ( आपटे ) ।४
२७ मंडळ प्रदर्शनपरिचय ।४
२८ फारसी पत्रव्यवहार (गं. ना. मुजुमदार) ५
२९ फारसी–मराठी कोश ( मा. त्र्यं. पटवर्धन ) ४
३० शिवचरित्रसाहित्य खंड १ ला ( रु. वा. पुरंदरे ) १॥
३१ Historical Miscellany १
३२ पुरंदरे-दप्तर, भाग १ ( रु. वा. पुरंदरे ) ४
३३ शिवचरित्रसाहित्य, खंड २ ४
३४ दक्षिणेच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें, खंड १ ( ग. ह. खरे ) २
३५ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, खंड १ संपला
३६ राजारामचरितम् मूळ संस्कृत ( वा. सि. बेंद्रे ) १॥
३७ मंडळांतील नाणीं ( ग. ह. खरे ) १
३८ शिवचरित्रसाहित्य, खंड ४ संपला १॥
३९ गोवळकोंड्याची कुतुबशाही ( वा. सि. बेंद्रे ) ४
४० ऐतिहासिक फार्सी साहित्य, खंड १ ( ग. ह. खरे ) १॥
४१ दक्षिणेच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें, खंड २ ( ग. ह. खरे ) २
४२ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, खंड २ १॥
४३ मंडळचित्रग्रंथ, चित्रें २० ।८
४४ शिवकालीन पत्रसारसंग्रह, खंड ३ ( शं. ना. जोशी ) २॥
४५ विजयनगर स्मारक ग्रंथ ( करमरकर व ओतुरकर ) ४
४६ ऐतिहासिक फार्सी साहित्य, खंड २ ( ग. ह. खरे ) १॥
४७ शिवचरित्रसाहित्य, खंड ६ (ग.ह.खरे) १॥
४८ मराठ्यांच्या सत्तेचा उत्तरेकडील विस्तार ( शं. पु. जोशी ) ।१२

४९ शिवचरित्रवृत्तसंग्रह ( कानडी ), भा. १ ( पां. भी. देसाई ) १॥
५० शिवचरित्रसाहित्य, खंड ७ ( रु. वा. पुरंदरे व ब. द. आपटे ) १॥
५१ ऐतिहासिक फार्सी साहित्य खंड ३ ( ग. ह. खरे ) १॥
५२ } शिवचरित्रवृत्तसंग्रह, खंड २ व ३ (१।)
५३ } फार्सी विभाग,(ग. ह. खरे), प्रत्येकी १।
५४ पुणें नगरसंशोधनवृत्त, खंड १ ( चिं. ग. कर्वे ) १
५४ अ, ऐ. संकीर्ण साहित्य, खं. ३ संपला
५५ शिवचरित्रसाहित्य, खंड ८ १॥
५५ अ, शिवचरित्रसाहित्य, खंड ५ संपला
५६ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, खंड ४ २
५७ ऐ. संकीर्ण वाङ्मय साहित्य, खंड १ १॥
५८ शिवकालीन दंडनीति (वा. सि. बेंद्रे) ३
५९ पुणें नगरसंशोधनवृत्त खंड, २ ( चिं. ग. कर्वे ) १॥
६० ऐतिहासिक संकीर्ण निबंध, खंड १ १॥
६१ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, खंड ५ १॥
६२ शिवचरित्रसाहित्य, खंड ९ १॥
६३ हिंगणे दप्तर, खंड १ ( ग. ह. खरे ) ३
६४ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, खंड ६ १॥
६५ ऐतिहासिक संकीर्ण निबंध, खंड ३ २
६६ पुणें नगरसंशोधनवृत्त खंड ३ ( चिं. ग. कर्वे ) १॥
६७ महाराष्ट्रांतील कांहीं ताम्रपट व शिलालेख ( डॉ. मो. गं. दीक्षित ) ३
६८ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, खं. ७ २
६९ ऐतिहासिक संकीर्ण निबंध, खं. २ ३
७० हिंगणे दप्तर, खंड २ ( ग. ह. खरे ) ३
७१ आंग्रेकालीन पत्रव्यवहार ( शां. वि. अवळसकर ) ३
७२ ऐतिहासिक संकीर्ण निबंध, खंड ४ २॥
७३ पेठे दप्तर, भाग १ (वि. सि. चितळे) ३
७४ Explorations at Karad 5
७५ संभाजीकालीन पत्र-सारसंग्रह व शकावली ( शं. ना. जोशी ) ३
७६ दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें, खंड ३ ( ग. ह. खरे ) ३
७७ ऐतिहासिक फार्सी साहित्य, खंड ४ ( ग. ह. खरे ) ३
७८ पेठे दप्तर, भाग २ (वि. सि. चितळे) ३
७९ पेशवेकालीन सामाजिक व आर्थिक पत्रव्यवहार ( इ. १८२२-१८५४ ) ( प्रा. रा. वि ओतुरकर ) ३
८० इतिहासकर्ते मराठे (ग. ह. खरे) २
८१ दाभाडे दप्तर, खं. १ (शं. ना. जोशी) ३
८२ दक्षिणच्या मध्ययुगिन इतिहासाचीं साधनें, खं. ४ (मो. गं. दीक्षित) ३
८३ पुणें नगरसंशोधनवृत्त, खंड ४ २
८४ ऐतिहासिक संकीर्ण निबंध, खंड ५
८५ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, खंड ८ ३
८६ शिवचरित्रसाहित्य, खंड १० ३
८७ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड ९ ३
८८ ऐतिहासिक संकीर्ण निबंध खं. ६ ५

**मंडळ-त्रैमासिक** पुस्तकें १ ते ३४ प्रत्येकीं ५ रु.

## शिवचरित्रग्रंथमाला ( स्वीय )

१ शिवकालीन पत्रसारसंग्रह, खंड १ ३॥
२ " " खंड २ ३॥
३ शिवाजी निबंधावली, खंड १ ३॥
४ शिवाजी निबंधावली, खंड २ ३॥
५ शिवचरित्रनिबंधावली ३॥
६ चित्रमय शिवाजी १
७ इंग्लिश रेकॉर्ड्स् ऑन शिवाजी १२

**सूचना:** स्वीयमालेंतील पुस्तकांच्या खरेदीवर खालीं दिल्याप्रमाणें सवलत मिळेल—
२५-५० रु. = १० टक्के; ५१-१०० = १२॥ टक्के; १०१ व पुढें = १५ टक्के.